


हिंदुस्थानांत प्रचार करूं लागल्या पासून

सन् अठराशें [illegible] रांत मराठ्यांचें

राज्य इंग्रेजांनीं

घेतलें तोंपर्यंत ही बखर.

मुंबईमध्यें सरकारी छापखान्यांत

छापिली सन् इसवी अठराशें

एकुणतीस



ॐ तत्सत्.

# उपोद्घात

अथवा

# प्रस्तावना

वेदान्त म्हणजे काय—आत्मज्ञानाची ( आपण कोण हें जाणण्याची ) आवश्यकता व महत्व—ईश्वरानुग्रहाचें फळ—अधिकारभेद—गुरु कां करावा—साधूंविषयीं अज्ञान लोकांचा समज—गुणग्राहकपणा व सत्संगतीचा महिमा—सर्व संतांच्या, सर्व भाषेंतल्या वेदान्त ग्रंथाचें तत्व एक आहे—श्रीमद्विवेकानंद स्वामींचे वेदान्तशास्त्रावरील बोलणें—व कैवल्यसागर ग्रंथाची हल्लींच्या प्रतींतील सुधारणा. इत्यादि.

"आमचें ज्ञान अपूर्ण आहे, तों पर्यंत हें दिसणारें विश्व निरनिराळ्या वस्तूंनीं भरलेलें किंवा निरनिराळ्या वस्तूंचें बनलेलें आहे, असें वाटतें पण, ज्या वेळेस आह्मांस त्याच्या तत्वाचें योग्य ज्ञान होईल—आमचें ज्ञान पूर्णतेस चढेल, त्या वेळेस हें विश्व विश्वपणानें नसून एक परमात्माच सर्व नटला आहे, असें आपणास कळेल," असें श्रीमत् शारदानंदस्वामी आपल्या-अमेरिकेंतील न्यूयॉर्कच्या-व्याख्यानांत ह्मणतात.* असें विश्वव्यापक-विश्वरूप तत्व काय आहे, हेंच वेदान्तशास्त्रांत सांगितलें आहे.

आतां, विश्वांतील बाह्यवस्तूंची ओळख करून घेण्याचे पूर्वीं आपण आपली ओळख करून घेतली पाहिजे. प्रपंचांत देखील आपणा स्वतःस जो चांगला ओळखतो, तोच दुसऱ्यासही चांगला ओळखील. स्वतःचीच शुद्धि नसेल तर दुसऱ्याची बेशुद्धि किंवा शुद्धि यास कशी कळणार? एखाद्या कुटुंबांत असो, किंवा राज्यकारभारांत असो, आपली योग्यता आपण जो पूर्णपणानें अथवा योग्यरीतीनें जाणतो, तोच इतरांशीं व्यवहार करितांना सुख पावतो. राजा किंवा तसाच एखादा मोठा अधिकारी आपला अधिकार—आपली सत्ता चांगली ओळखणार नाहीं, वेडेपणानें वागेल, तर तो एखाद्या क्षुल्लक शिपायांकडून देखील तुडविला जाईल. त्याचप्रमाणें, लहानसा शिपायी आपली असलेली लहानशी योग्यता ओळखून राहणार नाहीं

* The Brahmavadin, Vol. II, Page 170.

तर त्याच्या हातून त्याच्या वर्तनांत प्रमाद घडून तो दुःख भोगण्यास पात्र होईल. फार काय सांगावें? लहान अर्भकाच्या शिक्षणापासून तों राज्यक्रांतीसारख्या प्रकरणांत आजपर्यंत जे मोठमोठे अनर्थ घडून आले, ते फक्त आपापले अधिकार प्रत्येकांनी न जाणल्यामुळें—अथवा दुसऱ्या भाषेनें, आपापलीं कर्तव्यें खरीं न ओळखल्यामुळें ह्मणजे, आपले आपणास न ओळखल्यामुळें घडून आले आणि आतांही येतात, असें सूक्ष्मविचार केला असतां कळून येईल. त्याप्रमाणें, या अवाढव्य विश्वाच्या तत्वाची ओळख करून घेणें असेल, तर वर लिहिल्याप्रमाणें अगोदर आपली आपण ओळख करून घेतली पाहिजे; नसलेस अनर्थ घडतील—खरें तत्व समजणार नाहीं.

या अफाट विश्वांतील आपल्या अगदीं जवळची वस्तु ह्मणजे आपलें, शरीर, त्यापेक्षा जवळची आपलें मन, व त्याहीपेक्षां जवळची वस्तु आपला आत्मा. आपली ओळख ह्मणजे आत्म्याची ओळख. आत्मा ह्मणजे आपण. 'आत्मा' हा शब्द संस्कृत आहे व त्याचाच प्रतियोगी 'आपण' हा शब्द प्राकृत आहे, असें समजावें.

साधारण मनुष्यास आपण ह्मणजे आपलें साडेतीन हात शरीर एवढेंच काय तें ज्ञान असतें. हें ज्ञान पशुपक्ष्यांस व कृमीकीटकांसही असतें. मग मनुष्याचा थोरपणा कसला? तर **आत्मज्ञानाची** ह्म० आपण कोण हें समजण्याची योग्यता मनुष्यदेहास आहे. इतरास नाहीं. ह्मणून मनुष्यप्राणी सर्वांत श्रेष्ठ होय. आणि 'असा दुर्लभ मनुष्य देह प्राप्त झाला असतां जो स्वार्थ (स्व—आपण अथवा आपलें; अर्थ—ज्ञानः आपणपणाचें ज्ञान) साधणार नाहीं, त्या सारखा मूढ कोणीच नाहीं' अशी साधुजन त्याची निंदा अथवा कीव करितात.

हें मुख्य आपणपणाचें ज्ञान वेदांतशास्त्रांत उत्तमरीतीनें प्रतिपादन केलें आहे. ज्या शरीरास आह्मी 'आपण' असें ह्मणतों, तें शरीर काष्ठासारखें जड आहे. जड ह्म. ज्ञानहीन पण आपण त्या शरीरास जाणतों, त्याअर्थी आपण ज्ञानस्वरूप आहों. ज्ञानाला दुसरें नांव चैतन्य असें आहे. आपलें स्वरूप केवळ चैतन्य आहे, हें विसरल्यामुळें शरीरच आपण, असा भ्रम उत्पन्न झाला व या भ्रमामुळेंच पुनःपुनः जन्म व पुनःपुनः मरण ही शृंखला (बेडी) आपल्या पायांत पडली. ही अपार दुःखदायक जन्ममरण-

रूप बेडी तोडणें, हेंच काय तें मनुष्य जन्मांत येऊन आपणास करावयाचें आहे. एका वस्तूवर दुसऱ्या वस्तूचा भासहोणें, यासच भ्रम ह्मणतात. देहावर आत्म्याचा व आत्म्यावर देहाचा भ्रम, ह्मणजे देहास आपण मानणें व आपणास देह समजणें, असें नूतं घडलें आहे. तर विचारेंकरून हा भ्रम दूर केला पाहिजे. यास विचारावांचून दुसरें साधन नाहीं, असें आचार्य आपल्या विवेकचूडामणि ग्रंथांत ह्मणतात.

**चित्तस्य शुद्धये कर्म नतुवस्तुपलब्धये ।**
**वस्तुसिद्धिर्विचारेण न किंचित्कर्मकोटिभिः॥**

(अर्थ)–फक्त चित्तशुद्धीकरितांच कर्मांचा उपयोग. आत्मवस्तूच्या प्राप्तीकरितां नव्हे आत्मवस्तूची सिद्धि विचाराच्या योगानें होते. कोट्यवधि कर्मांच्या योगानें कांहींसुद्धा होणार नाहीं.

**अतो विचारः कर्तव्यो जिज्ञासोरात्मवस्तुनः ।**
**समासाद्य दयासिन्धु गुरुं ब्रह्म विदुत्तमम् ॥**

(अर्थ) याकरितां आत्मस्वरूप जाणण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें, दयेचा केवळ सागर अशा उत्तम ब्रह्मवेत्त्या गुरूला शरण जाऊन आत्मस्वरूपाचा विचार समजून घ्यावा इत्यादि.

पण अशी जिज्ञासा थोड्यांसच होते. कारण याला पुण्यसंचय पुष्कळ लागतो. कित्येकांना मुळींच गरजच वाटत नाहीं; ते याचा विचार करतील कशाला व गुरु तरी शोधतील काय ह्मणून? कोणत्याही गोष्टीचें महत्व समजल्यानंतर तिजविषयीं आवड उत्पन्न होणार. पण महत्व समजण्या इतकी त्यांच्या अंतःकरणाची योग्यताच नसते. वेदान्त हा शब्द ऐकतांच त्यांना भय वाटूं लागतें. त्यांच्यानें तो ऐकण्यास बसवत नाहीं. कारण त्यांत संसाराची निंदा केली आहे. त्याची आसक्ति सोडावी असें वारंवार सांगितलें आहे. हें कर्म तर मोठें कठीण व सर्व मनुष्यास आचरणाचें, असें त्यांना वाटतें. कारण त्यांच्या चित्ताची शुद्धी झालेली नसते. बेशुद्धीनें दुःख झालेलें कळत नाहीं. दारू पिऊन बेशुद्ध होऊन पडलेल्या मनुष्याचें कपाळ दगडावर आपटून फुटतें व त्यांतून रक्त वाहूं लागतें. किंवा पायावरून गाडी

जाऊन पाय मोडला, तरी त्यास त्याच्या बेशुद्धींत कांहीं कळत नाहीं. शुद्धीवर आल्यानंतर तें दुःख त्यास कळूं लागतें. त्याप्रमाणें सत्कर्मांचे योगें चित्तशुद्ध झालें ह्मणजे, आपण संसारांत भोगीत आहों तीं सुखें अत्यंत दुःख मिश्रित अथवा दुःखपरिणामीं आहेत, असें त्यास कळूं लागतें; व या दुःख सागरांतून केव्हां मुक्त होईन, अशी तळमळ उत्पन्न होते. अशी दुःखमुक्ततेची तळमळ उत्पन्न झालेल्या पुरुषास मुमुक्षु असें ह्मणतात. व असा मुमुक्षुच वेदान्तशास्त्र श्रवणाचा अधिकारी होय.

या अधिकाऱ्यांनही त्यांच्या त्यांच्या पूर्वकर्म संस्काराप्रमाणें मंद, तीव्र तीव्रतर असे पुनः भेद दृष्टीस पडतात.

लोकांत सन्मान पावण्याकरितां वेदांत शास्त्राचे ग्रंथ मुखोद्गत करणारे लोकांस 'शब्दज्ञानी' ह्मणतात. ते वरील तीनही प्रकारांत मोडत नाहींत. कारण त्यांस मुमक्षुत्व प्राप्त होऊन त्यांनीं त्या ग्रंथाचें अवलोकन केलेलें नसतें. ते जें वाचतात किंवा लोकांस तोंडानें सांगतात, त्याचा परिणाम त्यांच्या बुद्धीवर होत नाहीं. (श्रोतेजन आपापल्या अधिकाराप्रमाणें त्याचा फायदा घेतात.) वचनांचा बुद्धीवर अप्रकाश करणारें इतरांप्रमाणें त्यांचेंही एक मलीन कर्म त्यास आड येतें, तें सरलें व त्यांच्या पुण्यकर्मांचा उदय झाला ह्मणजे त्या ज्ञानाचा प्रकाश होण्यास त्यांस वेळ लागत नाहीं. पण मुमुक्षा (मोक्षाची इच्छा) उत्पन्न होईपर्यंत, तेच नव्हत तर कोणीही पुरुष अधिकारी या पदास येणार नाहींत. आता जे अधिकारी आहेत, त्यांचे वर सांगितल्याप्रमाणें प्रकार असे:—

(१) वेदांत शास्त्र लोक ऐकतात ह्मणून आपण ऐकावयाचें; मोक्ष ह्मणतात त्यांत एक मोठें सुख आहे, तें आपणास मिळावें, मोठे मोठे लोक—साधु-सत्पुरुष सांगतात तें कांहीं खोटें नसावें, तेव्हां त्यांत आपण मन घातलें तर आपली कांहीं नुकसान होणार नाहीं, असें वाटून जे वेदांताचे नादास लागतात, हात साधेल तेव्हां साधेल ,सापडला तर आपला आहे,नसल्यास कांहीं नुकसान नाहीं असें ह्मणणारे लोक अगदीं मंदप्राज्ञ अधिकारी होत. त्यांची विषयावरील वासना तिळप्राय कमी झालेली नसते. विषय सुखासारखेंच तें एक सुख आहे असें ते समजतात. असे लोक हे कर्म-

मार्गाचे अधिकारी होत. ज्ञाते सत्पुरुष अशा लोकांना वर्णाश्रमोक्त सत्कर्मे आचरण्याविषयीं उपदेश करितात. अशीं कर्मेकरून अंतःकरण शुद्धी झाल्या नंतर—

(२) संसार हा खरोखर दुःखानें भरलेला आहे, तेव्हां याची संगत आतां पुरे, असें वाटून जे या मार्गास लागतात, साधु संगतीची ज्यांना अत्यंत आवडी असते, मनाचा संयम व इंद्रियनिग्रह करण्याची ज्यांना अवश्यकता वाटून त्या प्रयत्नास लागतात, स्वस्वरूप समजण्याची ज्यांना उत्कंठा लागते, सदाचरणापासून जे विमुख होत नाहींत, ते तीव्र मुमुक्षु असें समजावें. त्यांस ज्ञाते सत्पुरुष आध्यात्मविचार व ईश्वराची निष्काम भक्ति करण्याविषयीं उपदेश करितात. मग ते ईश्वरानुग्रहानें लवकरच तीव्रतर अधिकारी होतात.

(३) अशा तीव्रतर अधिकाऱ्यास इहलोकचीं व स्वर्गलोकचीं सुखेंही काकविष्टेसारखीं तुच्छ वाटतात. तो नेहमीं आत्मानात्म विचारांत मग्न असतो. लोकमान्यतेचा तो तिरस्कार करितो. त्याला निरंतर एकांतवास आवडतो. शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा आणि समाधान यांनीं तो संपन्न असतो, व सहा सात दिवस उपवासी असलेल्या मनुष्यास जशी अन्नाची इच्छा असते, तशी त्याला मोक्षाची तीव्र इच्छा असते. हाच पुरुष वरील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सद्गुरूला शरण जाऊन आपला त्वरित उद्धार करून घेतो. ज्याचे हातून ईश्वराची निष्काम भक्ति पुष्कळ झालेली असते, त्यासच हा परमार्थाचा लाभ होतो. ईश्वरानुग्रहावांचून हा लाभ घडत नाहीं.

(ओव्या) गुरुद्वारा पाविजे ज्ञान । तेथें ईश्वराचा अभार कोण । येथ ईश्वरकृपेवीण । सद्गुरु जाण भेटेना ॥ झालिया सद्गुरु प्राप्ति । ईश्वरकृपेवीण न घडे भक्ति । सद्गुरु तोचि ईश्वरमूर्ति । वेदशास्त्रार्थी संमत ॥ गुरु ईश्वरां भिन्नपण । देखे तो नागवला आपण । एवं ईश्वरानुग्रहें जाण । ज्ञानसंपन्न होय जीवु ॥ गुरुंनीं सांगितली ज्ञानस्थिति । ते ईश्वरकृपेवीण चित्तीं । ठसावेना साधकांतिप्रति जाण निश्चितीं उद्धवा ॥

(एकनाथी भागवत. अ. २२ ओं. ९७-१० )

याप्रमाणें ईश्वरानुग्रहाचा महिमा, सद्गुरूचीं लक्षणें, सच्छिष्यांचीं लक्षणें, कुशिष्यांचीं लक्षणें, अधिकारभेद वगैरेचें वर्णन इतर ग्रंथांतरीं पुष्कळ

सांगितलें आहे. तें सर्व सांगण्याचें हें स्थळ नव्हे. ज्यांना परमार्थाची खरी आवड आहे, त्यांनीं देहाभिमान टाकून सद्गुरुचरणीं–संताचे चरणीं लीन झालें पाहिजे. अंगीं बहुश्रुतपणा असेल, व ईश्वरदत्त सूक्ष्मविचार करण्याचें बुद्धिसामर्थ्य असेल, तर ग्रंथवाचनानें परोक्ष ज्ञानास मदत होईल. यास ही ईश्वरानुग्रहच पाहिजे. प्रत्यक्ष गुरुमुखानें वेदान्तशास्त्र श्रवण करावें, अशी शास्त्राज्ञा आहे. नसलेस निदान आपल्या उपास्य देवतेच्या समोर ग्रंथ ठेवून त्या देवतेस सद्गुरु मानून, गुरुमुखानेंच आपण ग्रंथ श्रवण करीत आहों, अशी भावना करावी व वाचूं लागावें, ह्मणजे प्रसाद लवकर होईल, असेंही सांगितलें आहे. तात्पर्य आपली गुरुत्वाची भावनाच आपणास तारक आहे. कारण, मन ज्यावस्तूचें चिंतन करितें, त्या वस्त्वाकार तें होतें. तेव्हां त्याच्या या स्वभावाचा आपण फायदा करून घेतला पाहिजे. अथवा दुसरें असें कीं, निरनिराळ्या वस्तूंच्या चिंतनानें अंतःकरणाचे भाव व वृत्तीही निरनिराळ्या होतात; व तशा निरनिराळ्या वृत्तीवर निरनिराळीं कार्यें होतात, अथवा करावीं लागतात. आणि तशीं केलीं तरच त्यांत यश येतें. शांत वृत्तीवर घोर कार्यें होत नाहींत व घोर वृत्तींवर शृंगारिक कार्यें घडत नाहींत, अथवा तशीं बळेंच घडविलीं तर त्यापासून अनिष्ट परिणाम होण्याचा संभव असतो या करितां त्या त्या वृत्तीचीं कार्यें त्या त्या वृत्तीवरच केलीं पाहिजेत, ह्मणजे तीं चांगलीं होतात. तसें, परमार्थ प्राप्तीस अंतःकरणाची जी किंवा जशी सात्विक वृत्ति पाहिजे आहे तशी वृत्ति गुरुभावना केल्यानेंच उत्पन्न होते व मग तें अंतःकरण अध्यात्मविद्येला योग्य होतें.( आपण लघुत्व घेतल्यावांचून दुसऱ्यास गुरुत्व देतां येत नाहीं. लघुत्व घेणें ह्मणजे अहंकार सोडणें. हेंच परमार्थांत मुख्य कर्तव्य आहे. अहंकार हा या मार्गांत मोठा शत्रु आहे. तो नष्ट होण्यास इतर साधनें उपयोगी पडत नाहींत. त्यास गुरुच केला पाहिजे.)

अर्जुनाचें व श्री कृष्णाचें इतकें सख्य होतें, तरी अर्जुनानें '**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्** " असें ह्मटल्यावांचून गीता सांगण्यास आरंभ केला नाहीं. तसेंच, श्रीराम कौशिकमखसंरक्षणास जाण्याचे पूर्वीं पुष्कळ दिवस वैराग्यानें अगदीं तप्त झालेले होते व सद्गुरु वशिष्ठांस तें माहित होतें, तरी श्रीरामांनीं शरण येऊन प्रश्न केल्याशिवाय वशिष्ठांनीं उ-

पदेशास आरंभ केला नाहीं. शिष्यानें प्रश्नकेल्यावांचून गुरूनें आपण हो-ऊन सांगतों असें कधीं ह्मणू नये, असा शिष्टाचार आहे. यावर योगवाशि-ष्ठांत विश्वामित्र वशिष्ठांचा संवाद आहे. तो गुरु ह्मणविणारांनीं व शिष्य-साधकांनीं विचार करण्यासारखा असल्यामुळें येथें देतों. (ओव्या)

विश्वामित्र ह्मणतात

श्री राम परब्रह्म आपण । तोही वैराग्य दावी पूर्ण । वसिष्ठा तूं ज्ञानसंपन्न । उपदे-शी श्रीराम ॥ आजि तुजसारिखा सद्गुरु । आणि श्रीराम वैराग्याचें पूर्ण तारू । कासया लाविसी उशीरु । ज्ञानदाना ॥ वशिष्ठ ह्मणे विश्वामित्रासी । ज्ञानो-पदेश करी रघुनाथासीं । येरू ह्मणे तुमच्या शिष्यासी । उपदेशावया मज सांगों न-ये ॥ आणिकाचा शिष्य सुबुद्धि । आपण बोधूं नये स्वार्थबुद्धी । चाळवितां दूषणाब्धी । पडिजे जाण ॥ या लागी सूर्यवंशीं तूं कुळगुरु । ज्ञानोपदेश वक्ता चतुरु । श्रीराम वैराग्यें उदारू । उशिरु येथें न लावी ॥ वैराग्य बाणलिया शि-ष्यासी । विलंब करूं नये ज्ञानोपदेशीं । आत्मविद्या मच्छिष्यासी । द्यावी तत्काळ ॥ मग वशिष्ठ ह्मणतां परियेसा । शिष्यासी वैराग्य जालें सहसा । परी गुरूसी न प्रार्थि तां, उपदेशा । पात्र नव्हे ॥ गुरूसी शरण येउनी प्रश्न । शिष्य न करी जंव आर्त होऊन । तंव उपदेश करणें हें दूषण । गुरुत्वासि ये ॥ अभिलाषे करूनि बलात्कारें । शिष्यासी उपदेशिजे सादरें । तेथें गुरूचें ओस पडे खरें । सांप्रदायही ॥ ऐसें बोले जंव वशिष्ठऋषी । तंव श्रीराम उठोनि लागे चरणासीं । ह्मणे शरण आलों स्वामीसी । उद्धरीं मज ॥ इत्यादि.

(रंगनाथी योगवासिष्ठसार प्र. १ ओं. ३३५-४४)

याप्रमाणें रीति आहे. याकरितां साधकांनीं देहाभिमान टाकून तत्वज्ञात्यास शरण गेलें पाहिजे.

कांहीं अज्ञान लोकांचीं साधू विषयींचीं मतें फार चमत्कारिक अस-तात. त्यांचें ह्मणणें साधूंनीं संसारांत राहूं नये, त्यांस बायकामुलें असूं नयेत, त्यांणीं कोणावर रागावूं नये. त्यांनीं गवत सुद्धां खावें, लोकांचा छळ सोसावा, दगडांचा मार खावा इत्यादि. अशीं लक्षणें दिसलीं ह्मणजे मग हे लोक त्यांच्या पाया पडणार व मागणार मला मूल व्हावें, त्याला पैसा मिळावा, याचें दुखणें दूर व्हावें, इत्यादि भिकार असा अशा लोकांना! यावर सोहिरोबा ह्मणतात--

अज्ञान जनांचिया मना । ज्ञातेयं[1] असावें पाषण[2]माना । विषयसुख सेवना । सेवूं-चिनचे ॥ ह्मणती आम्हांचिसारिखा । मा तेथ कवण साधूलेखा[3] । येही घेऊनि आशंका । बुडाले ते ॥ ज्यांचिये दिठीचें लाघव । साधु कां घरी विषयभाव । तया चेतना घृति अभिप्राव । कैंवी कळे ॥ ययापरी बुडाले । पाषांड अवकें वरि-येले । तयां महत्सुख आंतलें । कैं कळों सके ॥

( सोहिरोबा कृत महदनुभवेश्वरी अ. १ला. )

याप्रमाणें, वेड्या सारख्या भलभलत्या शंका घेऊन शहाण्यांनीं आपल्या लाभास आंचवूं नये. कोणी कसेही असोत; आपल्याला गुणांशीं कारण. नेहमीं गुणग्राहीपणा शिकावा. त्यापासून आपल्यास पुष्कळ लाभ घडतात. दोषावर दृष्टी देऊन पहात राहिलें, ह्मणजे त्यांत आच्छादूत असलेले अमोलिक गुण आपल्यास लाभत नाहींत. ' संसारांत राहून फणस खायाला शिकलें पाहिजे. ' ह्मणजे—फणसावरील हातास बोंचणारे कांटे पाहून त्यांस न कंटाळतां तो फोडला पाहिजे; त्यांतील चारेतून गरे निवडून काढले पाहिजेत, ते काढतांना हातास त्याचा चीक लागतो, त्यास तेल लावलें पाहिजे; नरें अशा रीतीनें गरे काढले तरी काम आटपलें, असेंही नाहीं. ते सोलून त्यांतील बिया काढून टाकल्या पाहिजेत. तेव्हां अमृतासारख्या गोड रसाचा—गऱ्यांचा-आपणांस लाभ होणार याप्रमाणें दोषदृष्टी टाकून जो गुणाकडेच नजर ठेवतो त्यास उत्तम लाभ होतो. ( हें ह्मणणें परमार्थाप्रमाणें प्रपंचासही पुष्कळ लागू पडतें. ) पण—

मोठ्या दुःखाची गोष्ट ही कीं, कित्येक परमार्थाचे अभिमानी लोक साधारण प्रापंचिक लोकांतही दिसणारा सभ्यपणा व सौजन्य एकीकडे ठेवून एकमेकांकडे भांडतांना व एकमेकाचा द्वेष करितांना दृष्टीस पडतात ! कित्येक साधक आपली योग्यता नसतांही सिद्धपणा मिरवितात, व त्या योगानें विषयलोभांत गुंतून फुकट नाडले जातात. कित्येक पुष्कळ ग्रंथ वाचल्यानें आपण कृतार्थ झालों असें समजतात व शब्द ज्ञानाच्या घमेंडींत राहून आपला परमार्थ दवडतात. कित्येक अणिमादिक सिद्धींला भुलून आपला खरा व अविनाशी लाभ घालवितात. असी एक नि दोन तऱ्हेनें नागवणूक होते काय? या मार्गांत साधकांस अडथळा करणारीं

---

१ ज्ञात्यांनीं. २ पाषाणासारखें. ३ साधूपणा.

हजारों विघ्नें आहेत. तीं ईश्वरानुग्रहानेंच व सद्गुरुप्रसादानें दूर होतात. परंन्हीं स्वबुद्धिबळावर हा भवसागर तरून जाईन म्हटलें तर व्हावयाचें नाहीं. याकारितांच संतसमागम केला पाहिजे.

**(श्लोक)सत्संगेन परं प्राप्य दुस्तरं तरतेऽचिरात् ।**
**तस्मादति प्रयत्नेन सत्संगं सततं कुरु ॥ १ ॥**

( अर्थ- ) सत्संगानें परमात्म्याची प्राप्ती होतें व हा दुस्तर भवसागर तात्काळ तरून जातां येतो. या कारितां मोठ्या प्रयत्नानें सार्वकाळ सत्संगकर.

(ओंव्या)–संत माझे लळेवाड । त्यांची पूजा मज लागे गोड । संतसेवकाचें मी पुरवी कोड । मज निचाडा चाड संतांची ॥ सांडूनि माझें पूजा ध्यान । जो संतासी घाली लोटांगण । कोटी यज्ञाचें फळ जाण । मदर्पण तेणें केलें ॥ प्रतिमा माझ्या अचेतन व्यक्ती । संत सचेतन माझ्या मूर्ती । दृढभावें केल्या त्यांची भक्ति । ते मज निश्चितीं पावली ॥ प्रतिमा निजकल्पना उत्तम । संत प्रत्यक्ष पुरुषोत्तम । चालतें बोलतें परब्रह्म । अति उत्तम साधु सेवा ॥

( ए. भा. अ. ११ ओ. ११६५।६६।६७।६९

अशा संतांनीं जड जीवांचा उद्धार होण्याकारितां आपल्या स्वानुभवाचे ग्रंथ लिहून ठेविले आहेत. ते ग्रंथ नव्हेत, तर ग्रंथरूपानें, जगाचा उद्धार करण्याकारितां, आपणच राहिले आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांचीं तीं वचनें परम आस्तिक्यबुद्धीनें व श्रद्धेनें वाचावीं, ऐकावीं, त्यांचें मनन करावें, शंका येतील त्या ज्ञात्यांस विचाराव्या, आपल्याच मतानें चिखल कालवूं नये, एकाच ग्रंथांत अथवा एकाच्याच म्हणण्यांत एकमेकांविरुद्ध कांहीं वचनें आढळतील, त्यावर उगीच कल्पना लढवीत बसूं नये व कुतर्क काढूं नयेत, कारण असे कुतर्क काढून सवरून झाल्यानंतरच ते सिद्धांत लिहिले गेले आहेत, असें पक्कें समजावें. आपणास एखादी नवीन कल्पना सुचली म्हणून घमेंडी मानूं नये, ती यापूर्वीच दुसऱ्या एखाद्याच्या डोक्यांत आलेली आपल्या दृष्टीस पडते. व मग पश्चाताप होतो. नेहमीं आपल्यापेक्षां विद्वानांचा सहवास करावा त्या योगानें आपल्या ज्ञानांत भर पडते व दुष्ट अभिमान चढत नाहीं. वास्तुन पंडिताचे ग्रंथ पंडितांनींच वाचावे, अथवा जेवाचतील ते पंडित होतील. पण त्या वाचनानें इतर संतांच्या ग्रंथाचा तिरस्कार होईल, तर तो पंडितपणा नस-

ळेला बरा. कांहीं इतर ग्रंथांचे भक्त आहेत ते पंडिताच्या ग्रंथांस आग्रहीं ह्मणून दूपण ठेवून पहातही नाहींत. ते त्याच्या सत्य व अनुभवशीर अमोलिक पांडित्याला आंचवतात, व त्यायोगें आपला अरसिकपणा अथवा एककल्लीपणा जगास दाखवितात,तर तसेंही करतां नये. (कोणी इतर ग्रंथाचा द्वेष न करितां एखाद्या ग्रंथामध्येंच तृप्ती मानून राहतात. त्यांजविषयीं कांहीं ह्मणणें नाहीं. तसें करणें बरेंच आहे.)

कोणी संस्कृत भाषाभिमानी लोक प्राकृत ग्रंथ पहात नाहींत: तेही एका प्रकारें आपल्या रसिकपणाला मुकतात. कारण एकेक प्राकृत ग्रंथ असे आहेत कीं, ते संस्कृत ग्रंथालाही आपल्या प्रौढीनें मागें टाकतील. पण हा लाभ निरभिमानी लोकांस होतो. एकंदरींत कोणत्याही जातींतील संतांनीं कोणत्याही भाषेंत लिहिलेले वेदान्त ग्रंथ संस्कृत प्राकृत तर राहोच, पण पंजाबी, हिंदुस्थानी,गुजराथी,अथवा दक्षिणेंत कानडी, तैलंगी व द्राविडी भाषेंतील निरनिराळ्या साधूंनीं, निरनिराळ्या वेळीं, निरनिराळ्या देशांत लिहिलेले देखील एकमेकांस अगदीं तंतोतंत मिळतात, असें आढळून येतें. याचें कारण काय बरें? तर वेदान्तशास्त्र हें असेंच आश्चर्यकारक आहे. लेखक निरनिराळे झाले तरी सर्वांचा तत्वानुभव एकच असतो, ह्मणून सर्वांच्या ग्रंथांत असें साम्य आढळून येतें. मग वर्णन करण्याची शैली हवी तर निरनिराळी होवो. सोनार आपापल्या कौशल्याप्रमाणें अलंकार करतील, पण सुवर्ण कांहीं त्यांच्यानें करवत नाहीं, तें मुळचेंच सिद्ध असतें. **श्रीमद्विवेकानंदस्वामी** ह्मणतात*—'वेदान्तशास्त्र हें पूर्णपणें अपौरुष आहे; ह्मणजे त्याची उत्पत्ति एखाद्या पुरुषाकडून अथवा तत्ववेत्त्याकडून झाली, असें ह्मणतां येणार नाहीं. तें ख्रिस्ती, महंमदी बुद्ध वगैरे धर्माप्रमाणें कोणत्याही एका मनुष्याला आपला उत्पादक ठरवीत नाहीं. तरी तें तशा व्यक्त्युत्पादित कोणत्याही धर्माचा द्वेषही करीत नाहीं. जगांत नानाप्रकारचे पंथ आहेत, त्यांचें **वेदान्त**शास्त्र हें आदिपीठ होय आणि खरोखर **वेदान्तांत** व जगांतील इतर कोणत्याही धर्मांत अथवा शास्त्र नियमांत वाद किंवा विरोध नाहीं'. आणखी ते असें ह्मणतात कीं—

'वेदान्तशास्त्र जें एक अबाधित तत्व प्रतिपादन करितें, आणि जें

---

*The Brahmavadin 2 Page 34

तत्त्व जगांतील इतर सर्व धर्मांमध्यें आढळून येतें, तें हें कीं, मनुष्य हा ईश्वरी अंश आहे, आणि आपल्या भोंवतीं आपण जें जें पाहतो, तें सर्वही याच ईश्वरी ज्ञानाचें कार्य होय. सर्वांच्या पाठीमागें–आंत गुप्त असा एक अमर्याद समुद्र असून, त्याच्या तुम्ही आम्ही सर्व लाटा आहोंत. आणि आपण प्रत्येकजण आपल्यामध्यें असलेलें त्या समुद्राचें अनंतत्व बाहेर प्रगट करण्याचा नेहमीं प्रयत्न करीत असतों, हा समुद्र अस्तित्व, ज्ञान व आनंद यांचा समजावा. (यालाच सच्चिदानंदानंतस्वरूप परब्रह्म ह्मणतात.) या अमर्याद समुद्रावर आपला जन्मतःच हक्क आहे.....आपला आत्मा हा विश्वात्म्याशीं भिन्न नसून एकच आहे. ह्मणजे विश्वात्माच आपण आहों. सर्व सदाचरणाचें-नीतीचें मूलतत्व याच पायावर उभारलेलें आहे. शत्रूवरही दया करावी, कोणाचा द्वेष करूं नये, सर्वांशीं प्रीतीनें वागावें, नेहमीं दुसऱ्याचें बरें करण्यास झटावें, इत्यादि जो उपदेश सर्व धर्मांत सांगितला आहे, त्याचें कारण फक्त वेदान्तशास्त्रांतच उघड करून दाखविलें आहे. तें कारण ह्मणजे वेदांतील प्रसिद्ध महावाक्य "तत्त्वमसि" अथवा "तें तूं आहेस." हें होय.

लोकांचें बरें करशील तर तुझें बरें होईल, लोकांचें वाईट चिंतशील तर तुझें वाईट होईल, या ह्मणण्याचें तात्पर्य अथवा कारण काय? तर, तूं विश्व आहेस–ह्मणजे जगांतील प्रत्येक आत्मा तो तुझाच आत्मा व जगांतील प्रत्येक शरीर तें तुझेंच शरीर आहे. याकरितां परांचें बरें वाईट चिंतिणें तें आपलेंच करून घेणें होय इत्यादि.

'चिंती परा तें येई घरा' या ह्मणीचा अर्थ यावरून उघड होतो. व्यतिरेक ज्ञान झालें, तरी अन्वयज्ञानावांचून त्याची परिपक्वता नाहीं, असें वामनस्वामी ह्मणतात. 'वासुदेवःसर्वमिति स महात्मा सुदुर्लभः' असें भगवंतांनीं गीतेंत सांगितलें आहे. 'भगवद्भाव सर्वांभूतीं। हेंचि ज्ञान हेंचि भक्ति' या अभंग चरणाचा, व 'जें जें भेटे भूत। तें तें मानी भगवंत। हा भक्तियोग निश्चित। जाण माझा' या ज्ञानेश्वरांच्या ओंवीचा अर्थ तोच. आपल्या देहांत शुद्ध ज्ञानस्वरूपानें असणारा आत्मा ओळखिला, तरी तोच सर्व विश्वांत भरला आहे असें ओळखल्याशिवाय ह्मणजे सर्वात्मज्ञानाशिवाय परिपक्वता नाहीं. हें ज्ञान तोंडानें बोलून उपयोग नाहीं. तर तें आचरणांत

आणण्यास झटलें पाहिजे. असे ज्ञानी असतात, त्यांचा आपपर, शत्रु, मित्र, थोर नीच, पुण्यवान पापी' गाय व्याघ्र, पुरुष स्त्री, सुख दुःख इत्यादि द्वैत भाव मावळून जातो. त्यांची प्राणिमात्रावरील अथवा विश्वावरील बाह्य दृष्टि नाहींसी होऊन सर्वांच्या हृदयांत व सर्व विश्वांत सारखें व्यापून असलेलें जें परमात्म तत्व त्यांशीं त्यांची एकात्मता होते. हेच खरे सत्पुरुष होत. अशांच्या दर्शनानेंच पापीजनांचा उद्धार होतो. अशी परिपक्व स्थिति खरोखर बाणते, त्यावेळचीं त्यांचीं लक्षणें कशीं असतात, हें एखाद्या उदाहरणाचा पडताळा ताडून पहावा, त्याप्रमाणें साधुश्रेष्ठ **तुकारामांनीं** आपल्या एका अभंगांत फार उत्तम रीतीनें सांगितलें आहे. हा अभंग प्रत्येक साधकानें आपल्याशीं अनुभवून, अथवा आपल्या स्थितीशीं ताडून पहावा, म्हणजे आपली खरी योग्यता त्यास कळून गर्व वाटणार नाहीं. तो सोन्याच्या अक्षरांनीं लिहिण्यासारखा अभंग हा—

चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती। व्याघ्रही न खाती सर्प तया ॥ १ ॥ विष तें अमृत आघात तें हित। अकर्तव्य नीत होय त्यांसी ॥ २ ॥ दुःख तें देईल सर्व सुखफळ। होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ ३ ॥ आवडेल जीवां जीवांचिये परी। सकळां अंतरीं एक भाव ॥ ४ ॥ तुका म्हणे कृपा केली नारायणें। जाणिजे ते येणें अनुभवें ॥ ५ ॥

असो. अशा उच्चस्थितीस पोंचलेले या ' कैवल्यसागर ' ग्रंथाचे कर्ते श्रीमन्नारायणमहाराज होते. हे लहानपणापासून कडकडीत वैराग्यशील असून सद्गुरु श्रीदत्तमहाराजांचें प्रत्यक्ष दर्शन होण्याकरितां एका भयंकर पर्वतावर बसून यांनीं कांहीं दिवस तपश्चर्या केली, सद्गुरूंनीं यांची पुष्कळ प्रकारें कसवटी घेऊन आपलें दर्शन दिलें व अनुग्रह केला. असें सांगतात कीं, हे वाडीस कृष्णातीरावर ध्यानस्थ बसले असतां एक मोठा व्याघ्र येऊन त्यांच्या अंगास अंग घसटूं लागला. सर्व लोक भयाभीत होऊन दूर पळाले. तथापि यांच्या मनांत तिळप्राय भीति उत्पन्न न होतां, एखाद्या मुलास मांडीवर घेऊन गोंजारतात, त्या प्रमाणें ते त्यास करूं लागले. जणूं रडणाऱ्या पोरास त्याचा बापच समजावीत आहे. कांहीं वेळानें वाघानें आपला पाय त्यांचे हातीं दिला, तों त्यांत एक मोठा कांटा खुपसलेला त्यांस दिसला. त्यांणीं तो लगेच काढून टाकून पाठीवर हात थोपटून त्यास जाण्यास परवानगी दिली. तो वाघ पुष्कळ दिवस त्यांचेकडे येत असे. इत्यादि त्यांच्या आख्यायिका पुष्कळ आहेत. या नारायण महाराजांनीं लोकोपकारार्थ कैवल्यसागर

ज्ञानसागर, आनंदसागर, बोधसागर, वगैरे सप्तसागर रचिले आहेत. ते एकापेक्षां एक सुरस आहेत. त्यांत कैवल्यसागर हा ग्रंथ फारच महत्वाचा आहे.

याची एक आवृत्ति पहिल्यानदा फार वर्षांपूर्वी मुंबईस शिळाछापावर पोथीरूपानें छापिली होती. पण ती फार अशुद्ध असल्याकारणानें वाचकांचा फार घोटाळा होत असे. ( ती प्रतही आतां दुर्मिळ झाली आहे ) त्याची प्राकृत भाषा जुन्या शास्त्रीय पद्धतीची असून, तशी गद्यभाषा आधुनिक वाचकांस समजण्यास फारच कठिण; शिवाय, त्यांतील गुरु शिष्यांचीं प्रश्नोत्तरें मध्यें भेद न दर्शवितां लांबलचक एक सारखीं लिहिलीं असल्यामुळें व विरामचिन्हाकडेही लक्ष्य न दिल्यामुळें साधारण वाचकांस गुरूचें ह्मणणें कोणतें व शिष्याचें कोणतें हें समजणें फारच मुष्कील पडे; तसेंच, त्यांत प्रमाणार्थ दिलेले संस्कृत श्लोक, श्रुतिस्मृतिवाक्यें इत्यादिकांचें मराठींत भाषांतर नसल्यामुळें त्यांतील रस न समजून सिद्धांताचा ठसा मनावर उठावा तसा उठत नव्हता. या सर्व अडचणी लक्ष्यांत आणून हल्लींच्या प्रतींत सुधारणा केली आहे, ती या प्रमाणें.—

(१) शुद्ध करण्याच्या कामीं पुष्कळ मेहनत घेतली आहे. संस्कृत प्रमाणश्लोक वगैरे विद्वान शास्त्र्यांच्या साह्यानें व ते ते मुळ ग्रंथ मिळवून फार श्रमानें शुद्ध केले आहेत. (या श्रमाची कल्पना जुनी प्रत ताडून पाहिल्या वांचून कळणार नाहीं. )

(२) जुनी भाषा वाचकांस सुबोध होण्या करितां मूळचा मतलब अगदीं बिघडूं न देतां अथवा मुळांत किंचित्‌ही ढवळाढवळ नकरितां भाषेस नवें रूप येण्यासाठीं मध्यें मध्यें नवीन शब्द जुळवून दिले आहेत. अशा नवीन घातलेल्या शब्दांचें व स्पष्टीकरणार्थ कंसांत दिलेल्या शब्दांचें व वाक्यांचें अक्षर मूळापेक्षां बारीक घेतलें आहे. त्या योगानें मूळ ग्रंथ कोणता व त्यांत नवीन केलेला फेरफार कोणता, हें पाहणाराच्या लक्ष्यांत लगेच येतें. ( सत्पुरुषाच्या वचनांमध्यें आपल्या मतानें कमजास्त करण्याचा अधिकार कोणासही नाहीं. सबब अशी अक्षर योजना करावी लागली, अथवा ती मुद्दाम प्रीतिपुरःसर केली आहे, असें समजावें. ) गुरु, शिष्यांचीं प्रश्नोत्तरें निरनिराळीं करून लिहिलीं आहेत.

(३) प्रमाणार्थ दिलेल्या संस्कृत श्लोकांचें वगैरे फार श्रमानें मराठींत भाषांतर केलें आहे.

(४) विशेष समजुतीकरितां इतर अनेक सन्मान्य ग्रंथांतील उतारे वगैरे घेऊन **सुविस्तृत टिपा** दिल्या आहेत त्या फारच महत्वाच्या आहेत. व शेवटीं-

(५) सच्चिदानंदानंत ब्रह्मस्वरूपाचें लक्षण मनांत ठसण्याकरितां लहानसें **परिशिष्ट** जोडलें आहे. तें मूळ पुस्तकांतील पृष्ट ९१।९२ वरील दुर्बोध विषय सुबोध करण्याच्या हेतूनें लिहिलें आहे.

एकंदरींत, ग्रंथ जिज्ञासू वाचकांस होईल तितका सुबोध करणेचा मनापासून प्रयत्न केला आहे. तो परमेश्वरकृपेनें कितपत सिद्धीस गेला आहे, हें पाहण्याचें काम सुज्ञ वाचकांचें आहे.

हा ग्रंथ छापण्यास सुरवात करून आज दीड वर्ष झालें. परंतु, प्लेगरूपी महाकाळचक्राच्या फेऱ्यांत दुर्दैवी देशाबरोबर छापखान्यासही कांहीं दिवस काढावे लागल्यानें—छापखान्यांतील कांहीं लोकांनीं स्थलांतर केल्यामुळें वगैरे—पुस्तक छापून निघण्यास इतका उशीर लागला ही एक ईश्वर इच्छाच होय. जुने माहितगार लोक दुरावले व त्या ठिकाणीं नवे ठेवावे लागले; इत्यादि अनेक धांदलीमुळें, लक्ष पुरविलें असतांही नजरचुकीनें कांहीं अशुद्धें राहिलीं, त्याचें साग्र **शुद्धीपत्र** कडेला दिलें आहे, त्यावरून पुस्तक शुद्ध करून सुबुद्ध वाचकांनीं आंतील रहस्याचा लाभ घ्यावा, अशी विनंति आहे.

कैवल्यसागरचें जुनें पुस्तक व ईश्वरेच्छेनें तयार झालेलें हें नवीन पुस्तक ताडून पाहिल्यास त्यांतील महदंतर कळून सुरसिक वाचकांस आनंद झाल्यावाचून राहणार नाहीं, अशी पूर्ण आशा आहे.

शेवटीं, पुस्तकांतील संस्कृत प्रमाणश्लोक इ. शुद्ध करण्याचे व त्यांचें भाषांतर वगैरे करण्याचे कामीं ज्या ज्या सज्जनांनीं आपली अमोल्य वेळ व बुद्धी खर्च करून मदत केली, त्याचे आभार मानून, तसेंच ज्याच्या कृपेनें हें काम तडीस गेलें, त्या भक्तवत्सल सद्बुद्धिप्रेरक जगदीश्वराचे उपकार आठवून, व प्रेमळ वाचकांचीं मनें या ग्रंथाच्या वाचनानें सुप्रभ होवोत—त्यांच्या बुद्धींत खऱ्या ज्ञानाचा उदय होऊन त्यांना परमानंदाचा लाभ घडो, अशी त्याच प्रभूचरणीं प्रार्थना करून हा प्रस्ताव लेख पुरा करितों.

**गुरुकृपें मज बोलविलें देवें, ॥ होईल तें घ्यावें हित कांहीं ॥** ( तुकाराम. )

ॐ तत्सत्.

॥ ॐ तत्सत् ॥

॥ श्रीमद्गुरु प्रसन्न ॥



॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ अथकैवल्यसागरप्रारंभः ॥ ॐ नमो जी गणनायका ॥ नमः सर्वेंद्रियचाळका ॥ नमो बुद्धिप्रकाशका ॥ स्वप्रकाशा ॥ ॥ १ ॥ जय श्रीसद्गुरु सच्चिदानंदा ॥ मम हृदयनिवासा आनंदकंदा ॥ सर्वरूपा जगद्वंद्या जगदभिन्ना ॥ २ ॥ आतां नमो जी श्रीरामा जानकीजीवना पूर्णकामा ॥ जगन्मंगला जगद्धामा ॥ परात्परा ॥ ३ ॥ नमो शारदा वेदजननी ॥ पराशक्ति साक्षिणी ॥ ब्रह्मविद्या आनंदखाणी ॥ आपेंआप जें ॥ ४ ॥ आतां वंदू संतजन ॥ जें कां ब्रह्मविद्यासंपन्न ॥ ज्यांचेनि कारण जातां अज्ञान गहन ॥ दूर्य करिती ॥ ॥ ५ ॥ आतां वंदूं श्रोतेजन ॥ ज्ञानाधिकारी विरक्त पूर्ण ॥ वेदांतश्रवणीं सावधान ॥ पर-

मार्थिक ॥ ६ ॥ शब्दचातुर्याची नाहीं गोडी नाहीं गद्यपद्याची आवडी ॥ त्यांणीं येथें घावी बुडी ॥ अर्थासाठीं ॥ ७ ॥ समुद्राचें जीवन क्षार ॥ आंत पाहतां रत्नभार ॥ तेथें बुडी देऊन चतुर ॥ काढूं जाणती ॥ ८ ॥ तैसा येथं कैवल्य सागर ॥ शब्दलालित्य दिसंतें क्षार ॥ आंत अर्थरत्नें थोर ॥ अमोलिक ॥ ९ ॥ तया अर्थरत्नाचिया प्रकाशें ॥ अज्ञान अंधकार नाशे ॥ प्रभा फांकतां वस्तु भासे॥ निराभास ॥ १० ॥ ह्मणोनि येथं विचक्षणें ॥ शब्द गाळून अर्थ घेणें ॥ एसिया अनुभवी शहाणे ॥ संतोषती ॥ ११ ॥ येथं सद्गुरूचा बोध ॥ तोचि रंखिला स्वतःसिद्ध ॥ नादरोनि गद्यपद्य ॥ चातुर्यकळा ॥ १२ ॥ जें कां सद्गुरु देवें ॥ शिष्यासि बोधिलें स्वभावें ॥ तेंचि कैवल्यसागर ऐशिया नांवें ॥ लिहिलें जी॥ १३॥ आतां ऐका सावध ॥ कैसा येथील संबंध ॥ कोणत्या प्रकारें ब्रह्मबोध ॥ प्रकट झाला ॥ ॥ १४ ॥ कोणीएक ब्रह्मपुत्र ॥ आचारशील पवित्र ॥ बहुत काळ परतंत्र ॥ वर्तता झाला

॥ १५ ॥ ऐसें वर्ततां संसारीं ॥ जन्ममरणदुःख भारी ॥ जाणोनियां अंतरीं ॥ पस्तावला ॥ ॥ १६ ॥ ह्मणे माझें आयुष्य गेलें ॥ म्यां कांहींच सार्थक न केलें ॥ लोक मरमरोनि गेले ॥ देखत देखतां ॥ १७ ॥ पोटीं उपजला भवत्रास ॥ अंतरीं झाला उदास ॥ ह्मणे आतां पुरे सोस ॥ संसारसुखाचा ॥ ॥ १८ ॥ जे कां स्वर्गीं गेले ॥ तेही अमर असतां मेले ॥ ऐसे उभय लोक गमले ॥ नाशिवंत ॥ १९ ॥ यज्ञ दान तीर्थाटण ॥ व्रत तप नाना साधन ॥ केलियाही भवबंधन न तुटेची ॥ २० ॥ ह्मणे आतां काय करूं ॥ दुस्तर संसार कैसा तरूं ॥ धांव धांव हे सद्गुरु दीनबंधो ॥ २१ ॥ तूं सकळ जीवांचा तारू॥ मज पाववीं पैलपारु ॥ मग दोनी जोडोनियां करु ॥ नमन करी ॥ २२ ॥ तंव सर्वज्ञ सर्व व्यापक ॥ अनंतशक्तींचा नायक ॥ ऐसिया मुमुक्षुसाठीं देव ॥ प्रकट झाला ॥ २३ ॥ जेवीं तृषित चातकावर ॥ जळधर वोळे अपार ॥ नातरी चकोरां पीयूषकर ॥ उदेला

की ॥ २४ ॥ पाहून सद्गुरुमूर्ती ॥ शिष्यासि नाहीं देहस्फूर्ती ॥ सावध होऊनि मागुती ॥ नमस्कार करी ॥ २५ ॥ तंव सद्गुरूंनीं आलिंगिलें ॥ कारुण्यभावें पुसिते झाले ॥ बा तुज कोणीं गांजिलें ॥ सांग मज ॥ २६ ॥ शिष्य बोले जोडोनि कर ॥ त्रितापें पोळलों फार ॥ जन्ममरणें दुःख घोर ॥ झालें मज ॥ २७॥ आतां जन्ममरण तुटे ॥ कर्मबंधापासून सुटे अंगेंच परमात्मा भेटे ॥ ऐसें कीजे ॥ २८ ॥ ऐकूनि शिष्याची दीनवाणी ॥ करुणें द्रवला कैवल्यदानी ॥ ह्मणे आतां येच क्षणीं ॥ सुखिया होई ॥ २९ ॥ सद्गुरूसि मोठा कळवळा ॥ जीवीं जीव घालूं आला ॥ तंव निजानंदीं निमग्न झाला ॥ शिष्य स्वयें ॥ ३० ॥ हृदय हृदयीं मिळालें ॥ गुरुशिष्य एक झाले ऐसें नवल वर्तलें ॥ अकस्मात ॥ ३१ ॥ शिष्य सावध होऊन बोले ॥ धरून सद्गुरूचीं पाउलें ॥ माझें सर्वांग निवालें ॥ कृपादृष्टीं स्वामीच्या ॥ ३२ ॥ ह्मणे ऐसा आनंदपूर ॥ जेणें राहील निरंतर ॥ ऐसा कांहीं विचार ॥

मज निरोपावा ॥ ३३ ॥ जी हें आतां काय झालें ॥ एकाएकीं सुखिया केलें ॥ हें मागुतीं कोठें निमालें ॥ स्वानंदसुख ॥ ३४ ॥ मागुतां विक्षेप उदेला ॥ पूर्व आनंद काय झाला माझा स्वानंद मजला ॥ अखंड द्यावा ॥३५॥ तो परमात्मा आनंदघन ॥ अंगींच पाहीन आपण॥जेणेंहोईलसमाधान॥ऐसें कीजे॥३६॥

---

## ॥ अथ गुरुबोधः वार्तिक पद्धत्यालिख्यते ॥

नंतर सद्गुरु बोलते झाले "बा रे, जडचैतन्याचा निवाडा तत्वंपदाचें शोधन केल्यावांचून मोक्षही घडेना, देवही दिसेना." शिष्य बोले "जी स्वामी! जडचैतन्याचा निवाडा ह्मणजे काय?" गुरु बोले "बा रे, जड ह्मणजे-आपणातें नेणे आणि दुसऱ्यातें ही नेणे या नांव जड; आपणातें जाणे दुसऱ्यातें ही जाणे या नांव चैतन्य." शिष्य बोले "जी! ऐसियानें (अशानें) मज काय मिळालें?" सद्गुरु बोले "अरे, तूं कोण आहेस तें सांग." शिष्य बोले "जी स्वामी! मी अमुक देवदत्तनामक ब्रह्मकुलोद्भुन कश्चित् याचा पुत्र विष्णुदत्त-शर्मा गौरारुण, द्विहस्त, द्विपाद, सार्धवितस्तिमान (साडे तीन हात) हा देहच मी आहे, ऐशीच मज प्रत्यक्ष प्रतीति आहे."

**सद्गुरु उवाच** (सद्गुरु ह्मणाले)-'विष्णुदत्त' हें नाम कासयास आलें?

**शिष्य बोलला**-जी! या देहास मातापित्यांनीं संज्ञाभूत ठेविलें आहे.

गुरु.– अरे, देह जाणतो ' मी विष्णुदत्त ' ऐसें ?

शिष्य.–ना जी ! ( नाहीं महाराज. )

गुरु.–तो देह दुसऱ्यास तरी जाणतो ?

शिष्य.–ना. ( नाहीं जाणत. )

गुरु.–तरी तें ( देह ) काय ( कसें आहे ) ?

शिष्य.–तें जड आहे जी.

गुरु.–तूं तर जाणतोस कीं ' विष्णुदत्त ' या नामास व याऱ्या रूपास प्रत्यक्ष ' माझा देह ' ऐसें ह्मणतोस. तो तूं ह्या देहास जाणतोस, आपणास जाणतोस. तर आपणास जाणे. दुसऱ्यास जाणे तें काय ?

शिष्य.–तें चैतन्य.

गुरु.–तरी तुज ' देह ' जड आहे आणि ' मी ' चैतन्य आहे ऐसें कळतें कीं ?

शिष्य.–हो जी ! ( होय महाराज. )

गुरु.–तुला शिरःकपालादि अवयव मिळोन पंच भूतांचा देहः याचा फाड करून सांगूं. बा रे, श्रुतिस्मृति प्रमाणें ही सांगों —

रेतोरक्तप्रसूतं जडमशनचितं पञ्चिकारत्वगस्थि स्नायुः कृम्यंत्रमज्जारुधिरमयमति स्वल्पमाध्यामयाढ्यं ॥ प्राणापानैर्मृदादिप्रतिममपि चविट् कीटभस्मावशेषं देहं तं मूढ कस्मादहमिति मनुषे केन वा वंचितोसि ॥ १ ॥ आश्चर्यं किमु वैंद्रजालमपरं यद्गर्भवासस्थितं रेतश्चेतति हस्तमस्तकपदप्रोद्भूतनासांकुरं ॥ पर्यायेण शिशुत्व यौवनजराभेदैरनेकैर्वृतं पश्यत्यत्ति शृणोति जिघ्रति तथा गच्छत्यथागच्छति ॥ २ ॥ त्वगस्थि-

मांसविण्मूत्ररेतोरक्तादि संकुलः ॥ विकारी परिणामीच देह आत्मा कथं वद ॥ ३ ॥ आ-त्माचिन्निष्कलोनित्यो देहो बहुभिरावृतः ॥ त-योरैक्यं प्रपश्यंति किमज्ञानमतःपरं ॥ ४ ॥ आत्माज्ञानमयः पुण्यो देहो मांसमयोऽशुचिः॥ तयोरैक्यं प्रपश्यंति किमज्ञानमतः परं ॥ ५ ॥ देहोऽहमित्ययं मूढो धृत्वा तिष्ठत्यहो जनः ॥ ममायमित्यपि ज्ञात्वा घटद्रष्टेवसर्वदा ॥ ६ ॥ अहं द्रष्टतया सिद्धो देहो दृश्यतया स्थितः ॥ ममायमिति निर्देशः कथंस्याद्देहकः पुमान् ॥ ७॥ यस्मात्परमिति श्रुत्वा तथा पुरुष लक्षणं ॥ नि-र्णीतंत्वविमूढेन कथंस्याद्देहकः पुमान् ॥ ८ ॥ सर्वं पुरुषएवेदं सूक्ते पुरुषसंज्ञिके ॥ उच्यतेतु यतः श्रुत्या कथं स्याद्देहकः पुमान् ॥ ९ ॥

अर्थ—रेत व रक्त यांपासून ज्याची उत्पत्ति, जड, अन्नानें जगणारा, पड्विकार-युक्त, त्वचा, अस्थि ( हाडें ) कृमी, आंतडी, मज्जा, रुधिर यांहीं बनलेलें ज्याचें स्वरूप, स्वल्प आकाराचा, मानसिक व शारीरिक व्याधींनीं युक्त, प्राणोत्क्रमणानंतर केवळ मृत्तिकारूप, किंवा विष्ठा, किडे व भस्म असे तीनच परिणाम पावणारा (ह्मणजे व्याघ्रादिकांनीं भक्षण केला असतां विष्ठा, पुरला असतां कीडे व दहन केला असतां भस्म याप्रमाणें ज्याचे परिणाम,) अशा प्रकारच्या देहास हे मूढा ‘ मी ’ असें कशावरून ह्मणतोस? किंवा असें तुला कोणी शिकविलें ( फसविलें? ) ॥ १ ॥ आहा! काय आश्चर्य पहा! कीं, अन्नभक्षणानें पुरुषाच्या शरीरांत उत्पन्न झालेलें रेतच स्त्रीच्या गर्भामध्यें विकार पावून, त्यास हात, पाय, मस्तक, नाक इत्यादि अंकुर फुट-तात; व क्रमाक्रमानें बाल्य, यौवन व जरा अशा भेदानें जें आवृत्त होतें. व जें ( रेत ) गर्भवासांत राहिलेलें तेंच अशा स्वरूपानें बाहेर येऊन पहातें, खातें, ऐकतें, वास घेतें, जातें व येतें. तऱ्हां हें एक गौडबंगालच नव्हे काय?

॥ २ ॥ त्वचा, हाडें, मांस, विष्ठा, मूत्र, रेत व रक्त इत्यादिकांनीं व्यापलेला, आणि विकार व परिणाम पावणारा असा देह 'आत्मा' कसा होईल? ॥ ३ ॥ 'आत्मा' तर शुद्ध चैतन्यस्वरूप, निष्कल व नित्य ह्मणजे त्रिकालाबाधित ( कधींही नाश न पावणारा ) असा, व देह वर सांगितलेल्या बहुत विकारांनीं युक्त. तेव्हां या दोघांचें ( आत्म्याचें व देहाचें ) ऐक्य समजतात, यापेक्षां आणखी अज्ञान तें कोणतें? ॥ ४ ॥ तसेंच 'आत्मा' ज्ञानमय व पवित्र, आणि देह मांसमय (जड) व अपवित्र. असें असतां या दोघांचें ऐक्य पाहतात. यापेक्षां आणखी अज्ञान तें कोणतें? ॥ ५ ॥ हा किती उघड सिद्धांत आहे पहा; कीं, घटद्रष्टा ( घटास पाहणारा किंवा जाणणारा ) घटाहून भिन्न; तद्वत् देह 'माझा' असें ह्मणणारा अर्थात देहाहून भिन्न; असें असतां मूढजन देहच 'मी' असें मानून राहतात! ॥ ६ ॥ 'मी' हा **द्रष्टेपणानें** सिद्ध असून, 'देह' **दृश्यपणानें** स्थित आहे. तेव्हां, ज्याला ( पुरुषाला ) देह हा 'माझा' असें स्फुरण असतें, तो ( पुरुष ) च स्वतः देहरूप कसा असेल? ( दृश्याहून द्रष्टा भिन्न, तद्वत् देहास 'माझें' असें जाणणारा देहाहून भिन्न आहे )* ॥ ७ ॥ जो ( पुरुष ) 'देहाहून निराळा आहे' असें त्याचें लक्षण ज्ञात्यांनीं निर्णित केलें आहे, तो ( पुरुष ) देहरूप कसा होईल? ॥ ८ ॥ पुरुषसूक्तामध्यें 'सर्व पुरुष एवेदं' असें ज्याचें लक्षण श्रुतीनें वर्णिलें आहे, तो पुरुष देहरूप कसा होईल? ॥ ९ ॥

*गीतेंत ही असेंच सांगितलें आहे—'**इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते । एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञमितितद्विदः ॥**' **अर्थ**—या शरीराला 'क्षेत्र' असें नांव आहे व शरीरास जाणणारा ह्म० त्यास 'माझें' असें ह्मणणारा जो त्यास क्षेत्रज्ञ असें ह्मणतात. क्षेत्र ह्मणजे शेत व क्षेत्रज्ञ ह्म० शेतकरी. शेताहून शेतकरी निराळा, तसें देहाहून देही निराळा.

भागवतात ही असेंच ह्मटलें आहे—'**विलक्षणः स्थूलसूक्ष्माद्देहादात्मांक्षिता स्वदृक् ॥ यथाऽग्निर्दारुणोदाह्याद्दाहकोऽन्यः प्रकाशकः ॥** ह्मणजे, ज्या प्रमाणें दाह्य व प्रकाश्य अशा **काष्ठाहून**, दाहक व प्रकाशक असा **अग्नि** निराळा असतो; त्या प्रमाणें, दृश्य व जड अशा स्थूल व सूक्ष्मरूपी **देहद्वयाहून**, त्याचा द्रष्टा व प्रकाशक **आत्मा** अगदीं विलक्षण (निराळाच)

देह हा पंच भूतात्मक आहे. त्या पांच भूतांचे पंचवीस गुण या देहांत कोणकोणते आहेत तें सांगतात.—

पंच भूतें.— त्यांचे ( प्रत्येकांचे ) पांच पांच गुण.

१ पृथ्वी.–अस्थि, मांस, नाडी, त्वचा व रोम.

२ आप.–लाळ, मूत्र, शोणित, रेत व स्वेद.

३ तेज.–क्षुधा, तृषा, आलस, निद्रा व मैथुन.

४ वायु.–चलन, धावन, निरोधन, संप्रसरण व अकुंचन.

५ आकाश.–काम, क्रोध, भय, लोभ व शोक.

त्याच प्रमाणें **असंगः पुरुष इति श्रुतेः** ( ' पुरुष असंग आहे ' अशी श्रुति ) ऐसें असतां, देहच आत्मा ( मी ) ऐसें ह्मटलें, तर देह बहुतांचा संगी आहे व पुरुष तर असंग, तेव्हां हें वेदविरुद्ध होतें; ह्मणून ' देह मी ' ऐसें म्हणूं नको. याच प्रमाणें पुनः—

**असंगः पुरुषः प्रोक्तो बृहदारण्यकेपिच ॥ अनेक मलसंश्लिष्टः कथंस्याद्देहकः पुमान् ॥ १० ॥ तथा-चोक्तं । ब्रह्मैवाहं सदाशांतं सच्चिदानंदलक्षणं ॥ नाहं देहो ह्यसद्रूपो ज्ञानमित्युच्यते बुधैः ॥ ११ ॥**

आहे. यावर श्री एकनाथमहाराजांनीं किती चित्तवेधक टीका केली आहे पहा—
( ओंव्या ) स्थूल सूक्ष्म देहाहून । आत्मा तो सर्वदा भिन्न । तेणें वेगळे पणें जाण । करी वर्तन प्रपंचीं ॥ ५५ ॥ जीव उभयदेहीं वर्तता । प्राणियासि देहातीतता । स्फुरत असे सर्वथा । तेचि तत्वतां नेणती ॥ ॥ ५६ ॥ म्हणे माझा डोळा दुखों लागला । परि न ह्मणे मीचि दुखों आला । माझा पावोचि मोडला । परी मी मोडला हें न ह्मणे ॥ ॥ ५७ ॥ या परी देहीं वर्ततां । प्रत्यक्ष सांगे देहातीतता । हे आपुली आपणां अवस्था । नकळे भ्रांतां देहभ्रमें ॥ ५८ ॥ द्रष्टा दृश्य नव्हे सर्वथा । तें जड तो चेतविता । एवं आत्म्यासि विलक्षणता । जाण तत्वतां या हेतूं ॥ २५९ ॥ ( ए. भा अ. १० )

**निरामयो निराभासो निर्विकल्पोहमव्ययः ॥**
**नाहंदेहो ह्यसद्रूपो ज्ञानमित्युच्यते बुधैः ॥ १२ ॥**
**निर्गुणो निष्क्रियो नित्यो नित्यमुक्तोहमच्युतः॥**
**नाहं देहो ह्यस० ॥ १३ ॥ निर्मलो निश्चलोनंतो**
**शुद्धोऽहमजरामरः ॥ नाहं देहो ह्यसद्रूपो०॥१४॥**

**अर्थ**—' पुरुष हा असंग ( सर्वथैव अलिप्त ) आहे ' असें बृहदारण्य उपनिषदांत ही सांगितलें आहे. तेव्हां, अनेक मलांनीं युक्त असा देहरूप तो ( पुरुष ) कसा होईल? ॥ १० ॥ पुनः ह्मटलें आहे—मी ( आत्मा ) सार्वकाळ शांत व सच्चिदानंद स्वरूप ब्रह्म आहे. असद्रूप ( नाशिवंत व क्षुद्र असा ) देह मी नव्हे. यासच ज्ञाते लोक ज्ञान असें ह्मणतात. ॥ ११ ॥ मी निरामय ( व्याधी वगैरेपासून अलिप्त, ) निराभास, निर्विकल्प व अव्यय आहे; असद्रूप देह मी नव्हे. यासच ( या जाणण्यास ) ज्ञाते लोक ज्ञान असें ह्मणतात. ॥ १२ ॥ मी निर्गुण, निष्क्रिय ( क्रियारहित ), नित्य ( शाश्वत, त्रिकालीं ही असणारा ), नित्यमुक्त, व अच्युत आहे; असद्रूप देह मी नव्हे, या जाणण्यास ज्ञाते लोक ज्ञान असें ह्मणतात. ॥ १३ ॥ मी निर्मल, निश्चल, अनंत ( अंतरहित ), शुद्ध व अजरामर ( जरा व मरण यांचा संबंध नसणारा असा ) आहे; असद्रूप देह मी नव्हे. या जाणण्यासच ज्ञाते लोक ज्ञान असें ह्मणतात. ॥ १४ ॥

आणिकही सांगतात-**कस्तवायं जडो मूको देहे भवति राघव ॥ यदर्थे सुखदुःखाभ्यामवशः परिभूयसे ॥ १५ ॥ यदिवाहं पृथक् कृत्य चिन्मात्रेविश्रम्य तिष्ठति ॥ अधुनैव शांतो बंधमुक्तो भविष्यति ॥ १६ ॥ ॥ ॥**

हे राघवा! देहामध्यें, मी जड, मी मुका असें ह्मणणारा कोण बरें? कीं ज्याचे कारितां तूं परतंत्र होत्साता सुखदुःखांनीं पराभव पावतोस. ॥ १५ ॥ जर, असद्रूप-जड-देहाहून ' अहं ' ( मी-आत्मा ) निराळा करून केवळ चैतन्य स्वरूपांत विश्रांति पावेल, तर याच क्षणीं तो सर्व बंधापासून मुक्त होऊन शांत व सुखी होईल. ॥ १६ ॥

अरे! आतां तर अनेक श्रुतिस्मृतिवचनप्रमाणें सांगून सांगितलें; व हेच व्यासादिक शुकादिकाचे ही अनुभव. तथा भागवते (•त्याच-प्रमाणें भागवतांत. )

यस्यात्मबुद्धिः कुणपे त्रिधातुके स्वधीः कलत्रेषु
च भौम इज्यधीः ॥ यत्तीर्थबुद्धिः सलिले न क-
र्हिचिज्जनेष्वभिज्ञेषु स एव गोखरः ॥ १७ ॥
देहोहमिति या बुद्धिरविद्या सा प्रकीर्तिता ॥
नाहं देहश्चिदात्मेति बुद्धिर्विद्येव भण्यते ॥ १८ ॥
देहोहमिति धीस्त्याज्या सर्वनाशेप्युपस्थिते ॥
स्प्रष्टव्या नैव भव्येन सश्वमांसेव पुल्कसी ॥ १९ ॥

तस्माद्देहोहमिति कदापि न वक्तव्यम् ॥ भव्येन मुमुक्षुणा, पुल्क-सी-चांडाली ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

कफ, वात व पित्तरूप अशा शवाच्या ठाईं ' आत्मबुद्धि ' ( मलीन व जडस्वरूप देहासच ' मी ' असें मानणें ); कुटुंबाच्या ठाईं ' स्वबुद्धि ' ( ' माझें ' असें मानणें ); मृन्मय मूर्तीच्या ठायीं ' पूज्य बुद्धि, ' व उदकाच्या ठाईं ' तीर्थबुद्धि '; आणि ज्ञाते जनांच्या ठाईं सर्वथा अनादर बुद्धि धारण करणारा शुद्ध गाढवच समजावयाचा. ॥ १७ ॥ दिसणाऱ्या साडेतीन हात देहालाच ' मी ' असें मानणें ही अविद्या होय; आणि मी देह नव्हे, चिदात्मा ( चैतन्य-ज्ञानस्वरूप ) आहे, असें समजणें ही विद्या ( ज्ञान ) होय. ॥ १८ ॥ ' देह मी ' अशा बुद्धीचा सर्वथैव त्याग करावा. मुमुक्षूनें तर तिला ( देहात्मबुद्धीला ) स्पर्श देखील करूं नये. कुत्र्याच्या मांसासहित असणारी चांडाली जशी स्पर्शाला अयोग्य, त्या प्रमाणें देहात्म-बुद्धी स्पर्श करण्यास अगदीं अयोग्य आहे. ॥ १९ ॥ या कारितां 'देह मी' असें कधींही - चुकून देखील - ह्मणूं नये.

आणीक, बहुत ऋषी व महानुभाव यांचेही हेच सिद्धांत आहेत. तुज दृढ विश्वासाकारितां अनेक श्रुतिस्मृत्युदित प्रमाणें सांगितलीं. जो स्वानुभवेंकरून समजणार त्यास प्रमाणांतराची अपेक्षाच नाहीं.

'प्रत्यक्षास प्रमाण नको' ऐसा लोकसिद्धांतही तुज विदितच आहे. अरे, ज्यांचीं हीं वचनें, ते स्वानुभवेंच करून जाणून बोलिले आहेत कीं. ऐसें ( त्या प्रमाणें ) तूंही अपल्या स्वानुभवें करूनच 'मी देह नव्हे' ऐसें समजलासना? अरे आतां तूंच जें जें बोलशील तेंच दुसऱ्यास प्रमाण होईल बरें. तथा शिवोक्तिः सूत संहितायां। कस्त्वं पृष्ट इति ब्रूयाद्देहोहमिति पातकी ॥ किं तेन न कृतं पापं चौरेणात्मापहारिणा ॥ २० ॥ देहात्मबुद्ध्या यत्पापं न तद्गोवधकोटिभिः उत्सृज्य प्राकृतं भावं शिवोहमिति भावयेत् ॥ २१ ॥ ॥ ॥ ॥ ॥

अर्थ—सूतसंहितेमध्यें शंकरांनीं असेंच सांगितलें आहे. 'तूं कोण' असें विचारिलें असतां, 'मी अमुक-देह' असें ह्मणणारा महान् पातकी समजावा. प्रत्यक्ष आत्म्यास चोरणाऱ्यानें कोणतें एक पाप केलें नाहीं बरें? ( सर्व कांहीं पापें त्यानें केलीं! ) ॥ २० ॥ देहात्मबुद्धि ( 'देहच मी' अशी बुद्धि ) धारण केल्यानें जेवढें पातक लागतें, तेवढें कोट्यावधि गोवधांनीं देखील लागावयाचें नाहीं. याकारितां हा देहच मी असा-प्राकृत भाव टाकून, 'मी शिव आहें' अशी भावना करावी. ॥ २१ ॥

ऐसें आहे; तेव्हां देह हा तूं नव्हेस. वर्ण, आश्रम, कुळ, गोत्र, जाति व देह यांहून तूं विलक्षण आहेस. नत्वं विप्रादिको वर्णो नाश्रमी नाक्षगोचरः ॥ असंगोसि निराकारो विश्वसाक्षी सुखी भव ॥ २२ ॥ ( अर्थ ) तूं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र नव्हेस; तूं ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ किंवा सन्यासी ही नव्हेस; तूं इंद्रियांस गोचर नव्हेस ( ह्मणजे इंद्रियांकडून जाणला जात नाहींस ). तर तूं असंग, निराकार व विश्वसाक्षी आहेस असें जाणून अखंड सुखी हो २२

तसेंच नर, नारी, अथवा नपुंसकही तूं नाहींस. आतां तुज समजलें मी देह नाहीं ऐसें? ( 'मी देह नव्हें' असें तुला समजलें ना? )

शिष्य.--हो जी स्वामी!

**गुरु.**–तेव्हां तरी मी विष्णुदत्त ( एक मनुष्याचें नांव ); ऐसें भ्रांतीनें ह्मणत होतास, तर तें आतां ह्मणूं नको ' मी देह ' ऐसें बरें. तूं देह नव्हेस; देहाचे नामरूपाचा जाणता देहाहून वेगळा आहेस कीं.

**शिष्य.**–हो जी!

**गुरु.**–पंचीकृत पंचभूतांचे पंचवीस तत्वात्मक, एक एक भूताचे पांच पांच अंश ऐसें मिळोन त्वक्, अस्थि, मांस, विट् ( विष्ठा ) मूत्र, रेत, रक्तादि संकुल ( युक्त ) विकारी, परिणामी, कालकर्मगुणोत्पन्न ऐसा संघात मिळोन देह झाला. याचें नांव विष्णुदत्त. तूं तर यावेगळा आहेस. ऐसेंच कळलें असतां तुझीं कोणती दुःखें गेलीं आणि कोणते कोणते संबंध तुटले ते सांग.

**शिष्य.**–जी! मी कृश, स्थूळ, रोगी, विरूप, जन्ममरण, षड्विकार, क्षुधा, तृषा, हानीचा शोक, निंदा, स्तुतीचा हर्ष, विषाद, माझें आतां कसें होईल ही चिंता, हाय इत्यादिक सर्व दुःखें गेलीं; आणि माता, पिता, सुत, भ्राता, स्त्री, आप्त, गृह, वित्त, पशु, आराम, वृत्ति, ऋण, कायिक पाप, पुण्य या सर्वांचा संबंध तुटोन गेला; मी बहुत सुखी झालों. परंतु, अजून माझी हळहळ गेली नाहीं. कां मी बधिर, अंध, मला अग्न्यादि दाह, कंटक छेदादि दुःख होतें. यमदूत नेतील, दंड करितील, इत्यादि चिंता, भय, दुःख हें माझें गेलें व नाहीं. हें निःशेष जाय, मी निःशोक, निर्भय, स्वस्थ होय ऐशी स्वामींनीं कृपा करावी.

असें ह्मणून मागुतीं प्रणिपात केला असतां सद्गुरु बोलते झाले कीं, जें त्वां पुशिलें तें हा सर्व लिंगदेहाचा विस्तार पूर्वक खेळ आहे. या लिंगदेहाचें मर्दन झालें ह्मणजे ' मी लिंग देहा वेगळा ' ऐसें आपणास जाणशील. मग ' मी देहद्वय विलक्षण आत्मा आहे ' ऐसें तुज समजेल. मग तुझें हें सर्व दुःख जाईल.

शिष्य.–तरी सांगावें हें विवरण.

गुरु.–लिंगदेहाचें विवरण सांगतों तें ऐक. विषयपंचक, कर्मेंद्रियपंचक, ज्ञानेंद्रियपंचक, प्राणपंचक, व अंतःकरणपंचक ऐसें मिळोन पंचभूतांचे अंश, भूत पंचविंशति तत्वात्मक लिंग शरीर झालें; यासच 'सूक्ष्म शरीर' ह्मणतात. याचें विवरण–१ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध ( हें विषय पंचक ); २ वाक्, पाणि, पाद, उपस्थ, गुद ( हें कर्मेंद्रिय पंचक ); ३ श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण ( हें ज्ञानेंद्रिय पंचक ); ४ प्राण, अपान, व्यान, उदान, समान ( हें प्राण पंचक ); ५ अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त, अहंकार ( हें अंतःकरण पंचक ); ऐसीं पंचवीस तत्वें.

यांत कर्तृत्वकर्ते अंतःकरणपंचक. निर्विकल्प स्फुरण तें 'अंतःकरण'; तेंचि संकल्पविकल्पात्मक 'मन'; तेंचि निश्चयात्मक ह्मणोन 'बुद्धि'; तेंचि अनुसंधानात्मक ह्मणोन 'चित्त'; तेंच अहमस्मीति अहंवृत्त्या प्रतीयमान या नांव 'अहंकार'. ऐसें एकच अंतःकरण पांचां भेदीं स्फुरतें. अंतःकरण व्यानाचे आधारें श्रोत्रइंद्रियीं रिघोन शब्दविषय घेऊन वाचेंकरून बोलतें. मन समानाचे आधारें त्वगेंद्रियीं रिघोन स्पर्शविषय घेऊन हातें ( हातानें ) देतें घेतें. बुद्धि उदानाचे आधारें चक्षुरिंद्रियीं रिघोन रूपविषय घेऊन पायीं येतें जातें. चित्त प्राणाचे आधारें जिव्हाइंद्रियीं रिघोन रसविषय घेऊन उपस्थेंद्रियें रति-मूत्रोत्सर्ग करितें. अहंकार अपानाचे आधारें घ्राणेंद्रियीं रिघोन गंधविषय घेऊन गुदीं मलविसर्ग करितो. ऐसें अंतःकरणपंचक प्राणपंचकाद्वारें ज्ञानेंद्रियपंचकें ( ज्ञानेंद्रियपंचकाच्या योगानें ) विषयपंचक सेवून, कर्मेंद्रियपंचकें ( कर्मेंद्रियपंचकानें ) व्यवहार करितें. यांत कर्तृत्व भोक्तृत्व सुखदुःखाचें धर्माधर्म अंतःकरणपंचकाचे माथां. हर्ष, चिंता, भय हेही मनबुद्ध्यादिकांचेच धर्म समजावें.

**तथास्मृतिशास्त्र–रागेच्छासुखदुःखादि बुद्धौ सत्यां प्रवर्तते ॥ सुषुप्तौ नास्ति तन्नाशात्तस्माद्बुद्धेस्तु नात्मनः॥२३॥** **अर्थ**–इच्छा, प्रीति, सुख, दुःख, इत्यादि बुद्धीच्या ठायीं प्रतीत होतात. सुषुप्तींत–बुद्धीचा लय झाला असतां–प्रतीत होत नाहींत. तेव्हां हे सर्व धर्म बुद्धीचे आहेत; आत्म्याचे नव्हेत. ॥ २३ ॥ तेव्हां तूं तर, यांचीं सर्वांचीं–अंतःकरणादिकांचीं–नामें, रूपें, कर्में सर्वांहून वेगळेपणें ह्म० साक्षित्वें जाणतोस. इंद्रियांचीं नामें प्राणाचींही या सर्वांचीं नामरूपें कर्में, स्थानें, स्थिति आदिकरून तूं जाणतोस. अरे, हे सर्व ( इंद्रियादिक ) आपणास व दुसऱ्यांसही जाणत नाहींत; तुझ्या सत्तेकरून आपापला व्यवहार करितात. ते केवळ प्राण व इंद्रियें ह्मणतील कीं, 'आह्मी एकाएकीं स्वतंत्र होऊन व्यवहार करूं', तर त्यांस सामर्थ्य नाहीं. कोणताही विषय सेवणें झालें तर, जेव्हां त्या प्राणाची प्रेरणा, तो विषय, तीते–अंतःकरणवृत्तीतें, इंद्रियें, ऐसें मिळोन अन्योन्याश्रयें करून विषयग्रहण घडतें. ( प्राण, अंतःकरणवृत्ती, इंद्रियें व विषय यांच्या अन्योन्याश्रमानें विषय ग्रहण होतें. ) तुझ्याकडे याचें कर्तृत्व नाहीं, भोक्तृत्वही नाहीं. तुझ्या सत्तेकरून चेष्टतात. तथापि ( त्याच प्रमाणें ) **स्मृति–यथा चुंबकसान्निध्याचलत्येव बलादयः ॥ तथा त्वत्सन्निधानेन चेष्टते सर्वमिंद्रियं ॥ २४ ॥** ह्मणजे–ज्याप्रमाणें लोहचुंबकाच्या सान्निध्यानें लोह ( लोखंड ) चलनवलन पावतें, त्याप्रमाणें तुझ्या सन्निधानानें ( जवळ असण्यानें, संगतीच्या योगानें ) सर्व इंद्रियें चेष्टा करितात ( चलनवलन पावतात. ) ॥ २४ ॥ **तथाच** ( त्याचप्रमाणें **निमित्तं मनश्चक्षुरादिप्रवृत्तौ निरस्ताखिलोपाधिराकाशकल्पः ॥ रविर्लोकचेष्टा निमित्तं यथायः सनित्योपलब्धि स्वरूपोहमात्मा ॥ २५ ॥ यमग्न्युष्णवन्नित्यबोधस्वरूपं मनश्चक्षुरादीन्यबो-**

**भात्मकानि ॥ प्रवर्तंत आश्रित्य निष्कंपमेकं सनित्योपल ब्धिस्वरूपोहमात्मा ॥ २६ ॥** **भावार्थ.**–लोक व्यवहारास रवि हा ज्याप्रमाणें निमित्तमात्र आहे तसा मन, डोळे इत्यादिकांच्या प्रवृत्तीला कारणभूत व सर्वोपाधीरहित असा नित्योपलब्धस्वरूप आत्मा मी आहे ॥२५॥ अग्नि उष्णस्वरूप, तसा जो नित्य बोध ( ज्ञान ) स्वरूप असून, मनश्च-क्षुरादि हीं अबोधात्मक ( जडस्वरूपी ) आहेत. जड इंद्रियादिक हीं ज्या एका निष्कंपाचा आश्रय करून ( म्ह० ज्याच्या सत्तेनें ) आपापल्या कर्मात प्रवृत्त होतात, एरव्हीं स्वतः तीं असमर्थ व जड आहेत, तो नित्यो-पलब्धस्वरूप आत्मा मी आहें ॥ २६ ॥

असें आहे. यावरून तूं सत्तारूप व या सर्वांचा साक्षी आहेस तथा ( त्याप्रमाणेंच ) **येनेदंवेत्सि तज्ज्ञात्वा कुरु प्रत्यङ्मुखं मनः ॥ ततःप्रकाशरूपत्वं द्रक्ष्यसे स्फुटमात्मनः ॥ २७ ॥ येन शब्दं रसं रूपं गंधं जानासि राघव ॥ तमात्मानं परंब्रह्म चिद्रूपं विद्धि मुक्तये ॥ २८ ॥ ॥ ॥**

**अर्थ**–ज्या योगानें हें सर्व तूं जाणतोस, त्या मूळस्वरूपालाच जाणून मन प्रत्यङ्मुख ( अंतर्मुख ) कर; म्हणजे आत्म्यानें ( आपलें ) प्रकाश-रूपत्व तुझ्या स्पष्ट दृष्टीला पडेल. ॥ २७ ॥ हे राघवा! ज्या योगानें तूं शब्द, रस, रूप व गंध इत्यादिक जाणतोस, तो आत्मा चैतन्यघन परब्रह्म-स्वरूप आहे असें जाण, म्हणजे मुक्ति पावशील ॥ २८ ॥ इत्यादि.

**तेव्हां, यासर्वांस**( देह, मन, बुद्धि इंद्रियादिकांस ) **तूं जाणतोस कीं ?**

**शिष्य.**–हो जी! ( होय महाराज! )

**गुरु.**–आणीकही श्रुतिस्मृतिप्रमाणें बहुत आहेत. **एकोदेवः सर्वभूतांतरात्मा साक्षीचेतिश्रुतेः । बुद्ध्यादि साक्षीब्र-ह्मैवेतिश्रुतेः ॥** ( अर्थ उघड ) तेव्हां, पूर्वी जें तूं म्हणत होतास कीं, ‘ कर्तृत्वादि सुखदुःख सर्व चिंता जन्ममरण भय, यमलोकगमन, पापपुण्य इत्यादि सर्व हळहळ जीवीं; ’ तें तुझें भ्रमदुःख सर्व गेलें कीं ?

**शिष्य.**–हो जी स्वामी! मी या सर्वांचा साक्षी–या सर्वांहून वेगळा आहे. मी देहद्वय विलक्षण आहे.

**गुरु.**–अरे देहद्वय विलक्षणच आत्मा आहे. यास प्रमाण सांगू.–**सूक्ष्मं ते रूपमव्यक्तं देहद्वयविलक्षणं ॥ तस्माद्देहद्वयादन्यमात्मानमवधारयेत् ॥ २९ ॥** अर्थ–देहद्वयाहून विलक्षण, सूक्ष्म व अव्यक्त असें तुझें स्वरूप आहे. याकरितां स्थूळ व सूक्ष्म देहांहून आत्मा निराळा आहे असें समजावें. ॥ २९ ॥ **आतां तूज कळलें कीं? आतां तुर्शी कोणाशीं संबंध नाहीं.**

तथा शास्त्रमाह ( शास्त्रही तसेंच सांगतें. ) **शरीरस्य प्रियाप्रियोपत्हतिस्थितिरियं शरीरे वा वसंतं न प्रियाप्रियौ स्पृशत इति श्रुतिशास्त्रा । कामः संकल्पोविचिकित्सा श्रद्धा अश्रद्धा धृतिरधृतिर्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एवेति ॥३०॥**

अर्थ.–शरीराची प्रिय अथवा अप्रियभोगरूप स्थिति शरीरांत राहणाऱ्या पुरुषाला ( आत्म्याला ) स्पर्श करीत नाहीं. तसेंच, काम ( हेतु ) संकल्प, संशय, श्रद्धा, अश्रद्धा, धृति अधृति, लज्जा, बुद्धि, भीती इत्यादि हें सर्व ' मन ' होय. ॥ ३० ॥ परंतु तूं तर या मनाचा साक्षी आहेस.

**यथा घटद्रष्टा घटाद्भिन्न इति न्यायात् त्वं द्रष्टा दृश्यात् पृथक् स्थित इतिच ॥ ३१ ॥** अ० घटाचा द्रष्टा ( घटास पाहणारा ) ज्याप्रमाणें घटाहून भिन्न, त्याप्रमाणें ( त्या न्यायानें ) तूं द्रष्टा, देहादिक दृश्याहून भिन्न ( निराळा ) आहेस. ॥ ३१ ॥ **तथा भगवद्वचनं । इच्छा द्वेषः सुखं दुःखं चेतिक्षेत्रम् ॥ एतत् योवेत्तितं प्राहुः क्षेत्रज्ञमिति । क्षेत्रज्ञंचापि मां विद्धीति ॥ क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं ममेति ॥ ३२ ॥** अर्थ–इच्छा, द्वेष, सुख, दुःख इत्यादि मनोविकार यांस क्षेत्र ह्मणतात. यास जो जाणतो त्याला क्षेत्रज्ञ

ह्मणतात. क्षेत्रज्ञ तो मी ( परमात्मा ) असें जाण. क्षेत्रक्षेत्रज्ञाचें ज्ञान तेंच 'ज्ञान' असें मी मानितों. ( भ. गी. ) ॥ ३२ ॥

**आतां तुज कर्माचा लेश नाहीं. तथाचोक्तं** ( तसेंच आणखी सांगितलें आहे की, ) **यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ॥ सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३३ ॥ इंद्रियाणि पराण्याहुरित्यादिनापि, देहेस्मिन् पुरुषःपर इतिच ॥ शरीरस्थोपि कौंतेय न करोति न लिप्यते इति श्रुतिस्मृती ॥ ३४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥**

**अर्थ**—आकाश सर्वत्र व्यापक असून तें कोणत्याही पदार्थाच्या योगें लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा सर्व देहांत व्यापलेला असून त्या देहाच्या योगें लिप्त होत नाहीं. ॥ ३३ ॥ 'इंद्रियाणि पराण्याहुः' ( भ. गी. अ. ३ श्लो. ४२ ) या वचनेंकरूनही, देहेंद्रिय, मन, बुद्धि यांच्या पलीकडे आत्मा आहे. तसेंच 'शरीरस्थोपि कौंतेय०' ( भ. गी. अ. १३ श्लो. ३१ ) या वचनें करूनही, आत्मा सर्व शरीरांत व्यापक असून तो कांहीं करीत नाहीं व कशांतही लिप्त होत नाहीं. ॥ ३४ ॥

यावरून **गुरुवचन** व **स्वानुभवेंकरून** **लिंगशरीराहून** आत्मा **भिन्न ऐसें समजलें असतां नाना योनी भ्रमण भ्रंशन व गुणरहित होतो. [ बुद्धि, राग, प्रयत्न, द्वेष, संस्कार, धर्म, अधर्म, सुखदुःखानीति**

**१ महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेवच ॥ इंद्रियाणिदशैकंच पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥ इच्छा द्वेशः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ॥ एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥ ॥ ॥**

( भ. गी. अ. १३ ) **अर्थ**—पंचमहाभूतें, अहंकार, बुद्धि, अव्यक्त ( प्रकृति, जीवदशा, ) दश इंद्रियें, व इंद्रियांचे विषय, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, संघात ( देहेंद्रियादिकांचा समुदाय ), चेतना ( नखशिखान्त ओतप्रोत भरलेलें ज्ञान ) आणि धृति या सर्वांस 'क्षेत्र' असें ह्मणतात. या प्रमाणें श्रुतिस्मृतींची प्रमाणें आहेत.

नव ( ९ ) गुणाः ] बारे, आतां तुज समजलें ' मज जन्ममरण नाहीं. मी देहद्वयविलक्षण मुक्त आत्मा आहे, ' ऐसें ?

**आत्मा नाम्रियते जातु जायते नच वर्धते ॥ न जायते न म्रियते न गच्छति न तिष्ठति ॥ न स्त्री पुमान् वा पंढोवा आत्मा नित्यश्चिदात्मकः ॥ ३५ ॥ यावद्देहेंद्रिय-प्राणैर्भिन्नत्वं नात्मनो विदुः ॥ तावत्संसारदुःखौघैः पीड्यंते मृत्युसंयुताः ॥ ३६ ॥ ॥ ॥ ॥**

**अर्थ.**—आत्मा कधींच मरत नाहीं, उत्पन्न होत नाहीं व वाढतही नाहीं. तसेंच तो जात नाहीं व येत नाहीं अथवा उभा रहात नाहीं. तो स्त्री पुरुष किंवा नपुंसकही नाहीं; तर तो आत्मा नित्य चिदात्मस्वरूप आहे. ॥ ३९ ॥ जोंपर्यंत देहेंद्रियें व प्राण इत्यादिकांहून आत्मा भिन्न आहे असें जाणलें नाहीं, तोंपर्यंत मृत्युरूप संसारदुःखसमुदायापासून जीवास पीडा होणारच. ॥ ३६ ॥ **वस्तुतः** ( याकरितां ) **आत्मा याहून भिन्न** असें समजावें.

तथा ( त्याचप्रमाणें ) **देहेंद्रियमनःप्राणबुद्ध्यादिभ्यो विलक्षणः ॥ आत्मा शुद्धः स्वयंज्योतिरविकारी निराकृतिरिति ॥ ३७ ॥ अर्थ.**—देह, इंद्रियें, मन, प्राण, बुद्धि, इत्यादिकांहून आत्मा विलक्षण ( निराळा ) आहे. आत्मा शुद्ध, स्वयंज्योति, अविकारी व निराकार आहे. ॥ ३७ ॥ **अरे, आतां तर कांहीं अनुमान नाहीं ना? आपल्या अनुभवेंकरून पुरतें जाणितलें मी देहद्वयविलक्षण आत्मा** असें ?

**शिष्य स्वानुभवें बोले.**—' **जी स्वामी, प्रत्यक्षास प्रमाणांतराची अपेक्षा नाहीं. मी दोहीं देहाहून वेगळा नित्यमुक्त आत्मा आहे, ऐसें** जाणून **कृतार्थ झालों. परंतु, जी स्वामी (** महाराज ) **कांहीं शंका आहे.**

**गुरु.—काय रे?**

शिष्य.–अहो मी ऐसें ऐकिलें आहे कीं, ( शास्त्रोक्त ) आत्मानाम स्थूळसूक्ष्म कारण शरीरेभ्यो व्यतिरिक्त इति । स्थूलं सूक्ष्मं कारणाख्यमुपाधित्रितयंचित्तेरिति । अनाद्यनिर्वाच्यमपीहकारणमिति ॥ ३८ ॥ ॥ ॥

अर्थ.–आत्मा हा स्थूळ, सूक्ष्म व कारण शरीरांहून निराळा आहे; स्थूळ सूक्ष्म व कारण याप्रमाणें आत्म्याला तीन उपाधी आहेत. कारण शरीर हें अनाद्यनिर्वाच्य आहे. इत्यादि. ॥ ३८ ॥ तें कारण शरीर कोणतें? मी देहत्रयविलक्षण ऐसें मज समजलें पाहिजे; ऐसा स्वामींनीं अनुग्रह करावा. असें ह्मणोन शिष्यानें मागुती गुरूस प्रणिपात केला. तंव–

सद्गुरु बोलते झालें कीं, अरे, ऐसें जितुकें कल्पिशील तितकाच कल्पित विस्तार वाढेल. आतां स्थूळ सूक्ष्म हें प्रपंचकार्य. कारणावांचून कार्य होत नाहीं. म्हणोन कांहीं तरी कारण आहे; त्यापासाव हें स्थूळ सूक्ष्म कार्य उत्पन्न होतें. तेव्हां ‘ आत्माज्ञानाज्जगद्भाति ’ इत्यादिवचनात् आत्मविषयक अज्ञान हें कारण ऐसें बोलतात; वस्तुतः आत्मा तर देहद्वयविलक्षणच आहे. ऐसें अनेक श्रुतिस्मृति सिद्धांतवचनें करून तुज पूर्वींच निरोपिलें आहे. आणीकही शंकराचार्योक्ति सांगतों तीही एक. एवं देहद्वयादन्य आत्मा पुरुष ईश्वरः ॥ सर्वात्मा सर्वरूपश्च सर्वातीतोहमव्यय इति ॥ ३९ ॥ अर्थ.–याप्रमाणें आत्मा ( मी ) देहद्वयाहून निराळा असून सर्वांतर्यामी, सर्वरूपी व सर्वातीत आहे. ॥ ३९ ॥ अरे अजून तरी काय ह्मणतोस?

शिष्य बोले–जी स्वामी, अजूनही माझी तळमळ जात नाहीं; मज सुख होत नाहीं. ह्मणोन आत्मविषयक अज्ञान तर मज समजावें, आणि कारणशरीरंहून मी–आत्मा विलक्षण आहे. ऐसें मज

प्रत्यक्ष समजलें पाहिजे. ह्मणोन मागुतीं नमस्कार करून पाउलें धरिलीं असतां तंव तो पूर्णानंद महाकृपेचा सागर हेलावोन बोलता-झाला कीं,

गुरु.–बरें, सांगतों तें ऐक. जो तूं ह्मणतोस ' मी स्थूळसूक्ष्म-शरीराहून वेगळा आहे ' तो तूं कोण हें सांग तर बरें. तूं कसा आहेस? काय तुझें वास्तवरूप? मी हा अमूक ऐसें ' अयमात्मा ब्रह्म ' ऐसें या महावाक्यानुसंधानास करून आधीं ' इदम ' शब्द-वाच्यांश[2] तर सांग कीं ' मी हा अमूक ' ऐसें.

तंव शिष्य अंतरीं प्रवेशून देहद्वयाचा भाव सोडून, देहद्वयवि-लक्षण जाहे तो मी कसा आहे ऐसा भाव धरून आपणांस पाहूं गेला; तो मुहूर्त ध्यानस्थित असतांही आपला आपणांस साक्षात्कार न होय, तेव्हां तर्क कुंठित झाला. मग सद्गुरुसी प्रणिपात करून बोलता झाला कीं,–

शिष्य.–जी स्वामी! मी स्थूळ सूक्ष्म दोंही प्रपंचास वेगळे-पणें जाणतो तो मी. माझ्या मींच मला चोरलें. माझाच मला साक्षात्कार होत नाहीं. मी आपणांस पाहूं जातों तंव मला कांहीं कळत नाहीं हें काय? आतां माझा मला साक्षात्कार होय, माझें आत्मस्वरूप मला प्रत्यक्ष कळे, ऐशी स्वामींनीं कृपा करावी. असें ह्मणोन पुनः नमस्कार केला असतां,–

श्रीसद्गुरु बोलते झाले–" अरे तूं ह्मणतोस ' मी आपणांस पाहूं जातों तंव मज कांहीं कळत नाहीं. ' हेंच न कळणें ' कारण-

१ ' इदम् ह्म० हा. हा शब्द जीवभावार्थी योजितात. २ वाच्यांश ह्म० शब्दाचा वरवर दिसणारा अर्थ, व लक्ष्यांश ह्म० खरा गर्भितार्थ, ध्वनितार्थ. यांस वाच्यार्थ व लक्ष्यार्थ असेंही ह्मणण्याचा परिपाठ आहे. याचें अ-धिक विवेचन पुढें ' असिपदा ' वरच्या टीपेत आलें आहे. )

शरीर. यास आत्मविषयक अज्ञान ह्मणतात. या अज्ञानाचा नाश झाला, कारणशरीरावेगळा ऐसें समजलें ह्मणजे प्रत्यक्ष मोक्ष. अरे सावध होऊन अंतर्दृष्टी करून ऐक. तूं दोंही देहास जाणतोस हो. आणि आपणांस पाहूं गेला असतां ह्मणतोस कांहीं कळत नाहीं

कारण शरीचा निराश अरे, ऐसें ह्मणूं नको. ऐसें तूं उगीच भांबाऊन ह्मणतोस. अरे, जैसे वेगळेपणें तुज दोन्ही देह दिसतात, दोंही देहाचा साक्षी, दोंही देह कळतात, दोंही देहांस जाणतोस, तैसेंच ' कांहीं कळत नाहीं ' या कारणदेहासही जाणतोस. ह्मणजे—कांहीं कळत नाहीं ऐसें हें ' न कळणें तूं जाणतोस; त्या न कळण्याचा तूं साक्षी आहेस. अरे, तें ' न कळणें ' तुज दिसतें, तें ' न कळणें ' तुज कळतें, ह्मणूनच तूं त्या न कळण्याची खूण अवस्था सांगतोस. जेव्हां तें ' न कळणें ' तुला कळतें तेव्हां तूं त्या न कळण्याच्या वर आहेस, न कळण्यातें जाणतोस हाच तूं स्वप्रकाश ज्ञानस्वरूपच ' मी आत्मा आहे ' ऐसें अंगुलीनिर्देशेंकरून प्रत्यक्ष आपलें स्वरूप जाणितलें ? ”

शिष्य बोले—“ हो जी स्वामी ! मी दोंही देहास जाणतों, तैसें या न कळण्यासही वेगळेपणें प्रत्यक्ष जाणतों. हाच देहत्रयाचा जाणता देहत्रयावेगळा आहे. आतां न कळणें नाहींच. न कळण्यासुद्धां सर्व मलाच कळतें तो मी. आपणांसही जाणतो कीं, हा ज्ञानस्वरूप सर्वसाक्षी आत्मा मी आहें.

गुरु.—अरे, धन्य तूं हा आत्मस्वरूप जाणतोस. हाच तूं. यासच ' प्रत्यगात्मा ' “सर्वेश्वर ' ' तुरीय ' ' शिव ' ऐसें श्रुति मुनि गाताहेत, ध्याताहेत; सर्वांतर्यामी तूंच हा सर्वेश्वर सर्वसाक्षी आहेस, अरे, सूर्याचे ठायीं तम नाहीं, तैसा प्रकाशरूप तूं.

तुझे ठायीं अज्ञान नाहींच. ‘ न कळे ’ ऐसें ह्मणावें, तर जड आहे तें कांहीं ह्मणत नाहीं कळत नाहीं ऐसें; अगर तें ( जड ) ‘ न कळे ’ ऐसें जाणतही नाहीं. अरे, वास्तव तर न कळणें नाहींच ज्ञानरूप प्रकाश तूंच आहेस. जो हा तूं देहद्वयास जाणतोस, तोच हा ज्ञान-स्वरूप आत्मा तूं आहेस. तम नाहींच. ती नेणीव ( न कळणें ) तूंच दाटून उगीच प्रकाशित करतोस. मग ह्मणतोस ‘ न कळे ’ ऐसें, आणि त्या न कळण्यास जाणतोस जर तुवां नेणीव प्रकाशित न केली, आणि समजलास विचार करून कीं, दोंही देहास जाणतो तो तर हा मीच आहे दोंहीं देहास जाणतो तोच हा मी ज्ञानस्वरूप आत्मा आहे ऐसें आपणासही जाणतो, तर मी आतां कोणास पहावयास जाऊं? माझा मी मला सदासर्वदा प्रत्यक्षच आहे; जो दोंहीं देहास जाणतो तो तर हा मीच आहें; स्वप्रकाश सर्वज्ञ सर्वसाक्षी आत्मा मी; मग मी कां ह्मणूं ‘ कांहीं कळत नाहीं ’ ऐसें? आपलें स्वरूप आपणच जाणून न ह्मटलें कळत नाहीं ऐसें. तर मग न कळणें कोठून येईल? न कळणें कोठें नाहींच. जसा कोणी शहाणा चतुर एखादे प्रसंगीं ह्मणतो, ‘ बाबा आह्मांस कांहीं कळत नाहीं, आह्मी तर वेडे आहों ’ ऐसें जरी दाटून ह्मटलें, तरी काय न कळे ऐसें झालें? तो काय वेडा झाला? त्यास ठाऊक आहे ‘ हें एखाद्यास ठकवावयास आपण ह्म-णतो ऐसें; वस्तुतः मी कांहीं वेडा नाहीं; मला सर्व कळतच आहे. ’

आत्मस्वरूपाच्या ठायीं अज्ञान झालेंच नाहीं.

---

१ ( ओं. ) नातरी अज्ञान एक घडे । हें जयास्तव निवडे । तें अज्ञान नव्हे पुढें । कोणे काळीं ॥ १८ ॥

अर्थ—अज्ञान हें एक आत्म्याचे ठिकाणीं आहे, असा ज्या आत्म्याच्या योगानें विचार केला, त्या आत्म्याला तें अज्ञान कोणत्याही काळीं झालेंच नाहीं असें समजावें. ( ज्ञा. अनुभवामृत प्र. ७ वें. )

ऐसें तो ( शहाणा ) आपणास जाणतच आहे. एरव्हीं तो कशास ह्मणतो ' मी वेडा मला कळत नाहीं ' ऐसें? तो वेडेंपण धरील, दाटून न कळे ऐसें ह्मणेल, तर तें उभें राहील. आणि तोही जाणेल कीं, " हा माझाच खेळ आहे; मी उगीच ह्मणतों; वस्तुतः माझे ठायीं वेडेंपण नाहीं. कांहीं कळत नाहीं ऐसें ह्मणतों, परंतु माझे ठायीं न कळणें नाहीं; मी शहाणा आहे; मला सर्व कळतें. " ऐसें पक्कें समजून त्याणें, ' वेडा ' ऐसें किंवा ' न कळे ' ऐसेंही न ह्मटलें, तर मग आतां वेडेंपण किंवा न कळणें कुठेंही नाहींच. जेवीं तोच शहाणा सर्वजाणता आहे, तैसें तूंच आपणच ह्मणतोस ' कांहीं कळत नाहीं. ' मग त्या न कळण्यास जाणतोस. न कळणें याचा साक्षी आहे ऐसें ह्मणतोस. जर तूंच समजलास, अगर त्या ह्मटल ' सर्वांस जाणतो तोच हा मी सर्वांतीत आत्मा आहें; मी काय ह्मणून नेणिवेस धरूं? कां प्रकाशित करूं? काय ह्मणून ह्मणूं कांहीं कळत नाहीं ऐसें? आणि ऐसें समजून नेणिवेस न धारलें, नेणीव प्रकाशित न केली, कांहीं कळत नाहीं ऐसें त्वां जर न ह्मटलें, तर आतां हें न कळणें कोठें? तेव्हां न कळणें नाहींच. तूंच आत्मा सर्वांस जाणतोस, आपणांसही जाणतोस. हाच मी सर्वांचा जाणता ज्ञानस्वरूपच निरालंब साक्षी आत्मा आहे, ऐसें समजलें काय रे?

शिष्य.–जी! समजूनच आहें, पहिल्यापासून मी सर्वांस जाणतों. हा आत्मा मी. आतां मी कशासाठीं ह्मणूं कांहीं कळत नाहीं ऐसें? माझे ठायीं तें न कळणें नाहीं व कांहीं कळत नाहीं ऐसें ह्मणतही नाहीं. माझे ठायीं अज्ञानाचा लेश वार्ता किंवा नाम सुद्धां नाहीं मी सर्वसाक्षी स्वसंवेद्य आत्मा आहे.

गुरु.–तरी शाबास बापा. आतां जीवभाव नष्ट झाला. तूज स्वानुभवेंकरून आपलें स्वरूप प्रत्यक्ष कळलें कीं, मी सर्वेश्वर प्रत्य-

**गात्मा शिव आहे. आतां प्रमाणांतरांची अपेक्षा नाहीं. तथापि दृढतेकारणें अनेक प्रमाणें सांगू कीं हाच तूं ईश्वर, शिव इति. तत्र जीवत्वमाह** ( जीवत्व—जीवाचें स्वरूप सांगतात. ) **तस्मिन् देहेंद्रियादीनां संघाते स्फुरति स्वतः ॥ अयं सोऽहमयं भावः स जीवो मलगुंठितः ॥ ४० ॥** अर्थ.—देह व इंद्रियें यांच्या समुदायाच्या ठिकाणीं ' हा तो हा मी ' असा जो भाव स्फुरतो, तो मलगुंठित ' जीव ' होय. ॥ ४० ॥

**मुक्तिमाह** ( मुक्ति सांगतात. ) **यदा पुण्यविशेषेण लभते संगतिं सतां ॥ तदाचार्यप्रसादेन वाक्यार्थज्ञानतः क्षणात् ॥ ४१ ॥ देहेंद्रियमनःप्राणाहंकृतिभ्यः पृथक्स्थितः ॥ स्वात्मानुभवतः सत्यमानंदः स्यात्मनद्वयं ॥ एवं ज्ञात्वाम-योभवेन्मुक्त इति ॥ ४२ ॥** अर्थ.—पुण्यविशेषाच्या योगानें संतसंगति मिळते, तेव्हां सद्गुरुप्रसादानें महावाक्यार्थाचें ज्ञान होतें. म्हणजे देह, इंद्रियें, मन, प्राण, अहंकार इत्यादिकांहून सत्यानंदाद्वयरूप आत्मा निराळा आहे, असें समजतांक्षणींच मुक्ति प्राप्त होते. ॥ ४२ ॥

**मोक्षहेतुमाह** ( मोक्षाचें साधन सांगतात. ) **सतां संगतिरेवात्र कारणं प्रथमं स्मृतमिति । साधुसंगतिरेवात्र मोक्षहेतुरुदाहृतेति । तदेवाह । यदा सद्गुरुणा युक्तो बोध्यते बोधरूपिणा ॥ निवृत्तदृष्टिरात्मानं पश्यत्येव तदा स्फुटं ॥ जीवन्मुक्तस्तदा देही मुच्यते प्राकृतैर्गुणैः ॥ ४३ ॥**

अर्थ.—मुक्तीचें पहिलें कारण ( साधन ) संतसंगति होय—मोक्ष प्राप्त करून देणारें साधन साधुसंगतीच असें सांगितलें आहे. तसेंच आणखी सांगतात.—ज्या वेळीं बोधरूपी सद्गुरूकडून मुमुक्षु बोधिला जातो, त्यावेळीं त्याची दृष्टी प्रत्यङ्मुख होऊन त्याला आत्मस्वरूप स्पष्टपणें दिसूं लागतें; व त्याचवेळीं देही जीवन्मुक्त होऊन प्राकृत ( रज तमादि ) गुणांपासून मुक्त

होतो. ॥ ४३ ॥ अरे या कारणदेहाचा नाश झाला ह्मणजे जीवत्व नष्ट होतें. अर्थात् आपणांस जाणितलें ह्मणजे मोक्ष. हाच ग्रंथिभेद ह्मणवतो. तेंच सांगूं-**भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्व संशयाः ॥ क्षीयंतेचास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ ४४ ॥**

**अर्थ.**-(मायातीत परब्रह्माचें ज्ञान झालें ह्मणजे हृदयग्रंथी-( चिदचिद्ग्रंथी ) चा छेद, सर्व संशयाचा नाश, व सकल कर्मांचा क्षय होतो. ) यासच मोक्ष ह्मणतात. तेंच सांगूं-

**मोक्षस्य नहि वासोस्ति न ग्रामांतरमेवच ॥ अज्ञानहृदयग्रंथिनाशो मोक्ष इतिस्मृतइति ॥ ४५ ॥ अर्थ.**-मोक्ष कोठें ग्रामांतरीं ह्मणजे स्वर्ग, मृत्यु अथवा पाताळांत नाहीं; तर अज्ञानरूपी हृदयग्रंथीचा नाश तोच मोक्ष असें समजावें ॥ ४५ ॥

वस्तुतः बंध अथवा मोक्ष दोन्हीं नाहींत. **अज्ञानसंज्ञौ भवबंधमोक्षौ विचार्यमाणेतरणाविवाहनीति ॥ ४६ ॥ अर्थ.**-सूर्याचे ठिकाणीं दिवस व रात्र दोन्ही नाहींत, त्याप्रमाणें, विचार केला असतां बंध व मोक्ष हे दोन्ही अज्ञानच होत. **आतां कुठें तुझे ठायीं बंध आणि मोक्ष? तूं नित्यमुक्त ईश्वर आहेस. जे गीतोक्तिः आदित्यवर्णं तमसः परस्तादिति । तोच अज्ञानाहून पर हा तूंच आत्मा ऐसें अनुभवास आलें कीं?**

**शिष्य.**-हो जी!

१ ( ओंव्या. ) हृदय शब्दें अंतःकरण । तेंति अचित्त जड मळीण । त्याच्या ठायीं आभासलें चैतन्य । जें कीं ज्ञान स्वप्रकाश ॥ ३३ ॥ जयातें प्रमाता हें अभिधान । जें अहंप्रत्यय प्रत्यक्ष जाण । तें अंतःकरणेंसी एकपण । पावतां संपूर्ण ग्रंथी दोघां ॥ ३४ ॥ तया परस्परानुध्यासें । चित्तातें जडपण आत्मत्वीं दिसे । आत्मप्रकाश चित्तीं आभासे । एवं ग्रंथी बैसे जडाजडीं ॥ ३५ ॥ मन तेंचि मी ऐसा अध्यास । आत्मयासी झाला असे

गुरु.–आणिक याविषयीं प्रमाणें पहा.–**अज्ञानसाक्षिण्यरविंदलोचने कारणाज्ञानहीनमितिच । इत्यादि अनेक** निर्देश आहेत. जीव ऐशी भ्रांति. वस्तुतः जीवत्व नाहींच. तें सांगों.–**साक्षिण्यारोप्यते भ्रांत्याजीवत्वंच तथाऽबुधैरिति । जीवात्मा परमात्मा व पर्यायौ नात्र भेदधीरिति ॥ तस्मात् कदाचिन्नेक्षेत भेदमीश्वर जीवयोरिति । भिन्न दृष्टेर्भयं मृत्युस्तस्येति भयंद्वितीयाभिनिवेशतःस्यादिति ॥ स्वल्पमप्यंतरं कृत्वा जीवात्मपरमात्मनोः । यस्तिष्ठति विमूढात्मा भयं तस्याभिभाषितमिति ॥ ४७ ॥**

**अर्थ.**–सर्वसाक्षीस्वरूप आत्म्याच्या ठिकाणीं मूढ लोक भ्रांतीनें जीवत्वाची कल्पना करितात. जीवात्मा व परमात्मा यामध्यें भेदबुद्धी नाहींच. याकरितां जीव ईश्वर यांमध्यें कधींही भेद मानूं नये. भेददृष्टीच्या ठायीं मृत्यूचें भय आहेच. आपणांहून दुसरें कांहीं आहे अशा समजुतीमध्येंच भय असतें. जीवात्मा व परमात्मा यांमध्यें थोडा तरी भेद आहे असें मानून जो मूढ पुरुष राहतो, त्याच्या पाठीं भय हें लागलेलेंच आहे असें समजावें ॥ ४७ ॥ **किंबहुना श्रुतिरप्येनदेवाह** । ( किंबहुना श्रुति देखील असेंच ह्मणते. ) **द्वीतीयाद्वैभयंभवतीति श्रुतेः । किंचरज्ज्वावहिमिवात्मानं जीवं ज्ञात्वा भयं भवेत् ॥ परात्मा-**

सोम । तेणें देहादि हा सर्वाभास । संसारपाश पडे जेणें ॥ ३६ ॥ जोंवरी चित्तीं अध्यास मीपणाचा । तंववरी आत्मयासी संसारबंध साचा । मग कल्पमात्रें त्याचा । मोक्ष कैसा होईल ॥ ३७ ॥ तेंचि सद्गुरूचें दर्शन होतां । आत्मानात्मविवेक करी चित्ता । ह्मणे मी आत्मा अकर्ता अभोक्ता । भिन्न चित्ता द्रष्टेपणेसीं ॥ ३८ ॥ मन आणि दृश्य मजहूनि भिन्न । मी आत्मा तयाचा साक्षी पूर्ण । ऐसें जाणतांचि होय दहन । सर्वेचि जाण चिदाचिद्ग्रंथी ॥ ३९ ॥ आणीक करितां उपायांतर । कदापि न घडे अन्यप्रकार । ब्रह्म देखिजे जें परावर । तरीच संसार भस्म होय ॥ ९९ ॥ आणीक

**ह्यमिति ज्ञात्वा भयदुःखैर्विमुच्यते ॥ ४८ ॥ तस्मात् जीवत्वं नास्त्येव । यथाहि, मृद्भूमि घटभ्रांतिः शुक्तौवा रजतस्थितिः ॥ तद्वद्ब्रह्मणि जीवत्वं वाक्यमाणेच नश्यति ॥ ४९ ॥ यथा मृदि घटो नाम कनके कुंडलाभिधा । शुक्तौहि रजतख्यातिर्जीवशब्दस्तथा परे । ५० ॥**

अर्थ.–भय तें दुसऱ्याकडून असें श्रुति सांगते. ( ह्मणजे–आपलें भय आपणास वाटत नाहीं. ) आणखी, रज्जूचे ठिकाणी सर्प मानावा त्याप्रमाणें आत्म्याचे ठिकाणी जीवाची कल्पना केली असता भय प्राप्त होतें; तेंच मी मायातीत परब्रह्म ( आत्मा ) आहें असें जाणलें असता भय व दुःख यांपासून मुक्त ( सुटका ) होते. ॥ ४८ ॥ याकरिता जीव नाहींत. पुनः सांगतात–ज्याप्रमाणें मृत्तिकेच्या ठिकाणीं घटभ्रांति, अथवा शुक्तिकेच्या ( शिंपीच्या ) ठिकाणी रजताची ( रुप्याची ) भ्रांति, त्याप्रमाणें ब्रह्माच्या ठिकाणी जीवत्वाची लटकी कल्पना आहे; असें जाणलें ह्मणजे जीवत्व नाहींसेंच होतें. ॥ ४९ ॥ अथवा, मृत्तिकेलाच घट हें नाम, किंवा सुवर्णासच अलंकार हें नाम, तसेंच शुक्तिमध्यें रजत हा शब्द, त्याप्रमाणेंच परब्रह्माचे ठिकाणीं जीव हा शब्द आहे. ॥ ५० ॥ **तेव्हां जीव हे नाम देखील नाहीं. तूं ईश्वर आहेस. हें तुज स्वानुभवें समजलें की?**

**शिष्य.–जी! मी ईश्वर आहें ऐसें मज समजलें.**

**गुरु.–जो प्रकृतीचा भर्ता मायाधीश, यस्माद्विभेत्यखिल मोहकरीच माया** ( अखिल मोहकारी माया ज्याला भिते, ) **तो तूं**

उपाय करितां सृष्टी । जाती अनेक कल्पकोटी । परी न तुटे संसारपाटी । ब्रह्मेंसी भेटी कदा नव्हे ॥ ६० ॥ सकळ उपायाचा शिरोमणी । तो ब्रह्म साक्षात्कार ये जनीं । झाल्या, संसारश्रेणी । भवंवसेनी तुटोनि जाती ॥ ६१ ॥ तें ब्रह्मदर्शन होताचि क्षणीं । चिदचिद्ग्रंथी जाय तुटोनी । संशयराशी जाती निरसोनी । क्षय निर्वाणीं कर्माकर्म ॥ ६२ ॥

( रंगनाथी योगवासिष्ठसार प्र० ९ वें. )

मायेचा नियंता. **प्रकृतेः परतः पुरुषः** ( प्रकृतीच्या पलीकडे असणारा पुरुष ) तो तूं कीं.

**शिष्य.**-हो जी स्वामी! हें समजलें परंतु आणिक कांहीं पुसावें ऐशी आशंका आहे.

**गुरु.**-पुस जी. ( विचार बाबा. )

**शिष्य.**-मी ऐसें श्रुतिस्मृतियुक्त ऐकिलें आहे कीं,-**द्वासुपर्णासयुजासखाया समानं वृक्षं परिषस्वजाते । तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्यनश्नन्न्यो अभिचाकशीतीतिश्रुतेः ॥ ५१॥**

अर्थ.-दोन पक्षी मित्रभावानें सर्वकाळ बरोबर असणारे एकाच वृक्षावर राहतात. त्यांपैकीं एकटा गोडगोड ( सुखदुःखादि ) फळें भोगतो, व दुसरा कांहीं न खातां प्रकाश पहातो. ( साक्षित्वानें राहतो. ) ॥ ५१ ॥ तेव्हां अन्य जो हा जाग्रदादि विनिर्मुक्त, तो ईश्वर ऐसें समजलें. परंतु, वास्तव म्यां ऐसें ऐकिलें आहे कीं,-**आत्मातु जीवेश्वराभ्यां प्रतीयमानाभ्यां भिन्न इति । तत्वंहि यत् प्रकृतिपुरुषयोः परमिति ॥ ५२ ॥** अर्थ.-प्रत्ययाला येणारे जे जीवेश्वर त्याहून आत्मा भिन्न आहे; खरें तत्व प्रकृतिपुरुषांहूनही भिन्न आहे. ॥ ५२ ॥ तो मी आत्मा कसा आहे? ईश्वरत्वही नाहीं; जेथें प्रकृतिपुरुषांहूनही पर ईश्वर आहे; व तो तर परात्पर आहे. तेव्हां मी परात्पर आत्मा कसा, हें समजे ऐसा अनुग्रह करावा.

ऐसा शिष्याचा पूर्णचंद्र उदयातें आला, ऐसें पाहून सद्गुरूचे बोधसिंधूस अपार भरतें आलें. बोधतरंग उसळते झाले. नंतर सद्गुरु प्रसन्न होऊन बोलते झाले.-

**सद्गुरु.**-बारे, हें जें सर्वांस जाणतें, तिंही ( तिन्ही ) देहाचें अवलोकन करितें, तें तुझें ‘ महाकारण ’ शरीर. जैसें मागील तीन

दृश्य जड, तैसें हेंही तुज दृश्य आहे, जड आहे. तूं या चवथ्या देहाहून पर–वेगळा–आहेस. मायाप्रधानंतु परं शरीरकमिति। कार्यकारणांचें कारण ह्मणोन ‘ महाकारण ’ नाम मात्र. कार्य-कारण गेलें, मग महाकारण कोण ह्मणेल? अरे, ही साक्षिणीही तुझी आत्मप्रभा आहे. हीच ‘ शुद्धमाया ’ ‘ आदिशक्ति ’ तिहीं देहाचें साक्षित्व करिते म्हणोन इलाच ‘ तुर्या ’ ऐसें ह्मणतात. मी प्रत्यगात्मा, मी सर्वसाक्षी असा अभिमान आहे, तंववर शबलत्व आहे. जेव्हां हा देखील अभिमान सोडशील, तेव्हां तिहीं देहांचें साक्षित्व लीन झालें ह्मणजे जीवेश्वरोपाधीरहित मी कूटस्थ आत्मा ऐसें आपणांस जाणशील.

**शिष्य.**–तरी कैसें जाणूं हें सांगावें.

**सद्गुरु.**–ऐक. अरे, ‘ साक्षित्व ’ ह्मणजे ‘ पाहणें ’–यासच ‘ जाणीव ’ ह्मणतात. तें कोठवर आहे? जंववर इकडे तिन्ही देह विद्यमान आहेत, तंववर तें साक्षित्वही आहे. जर देहत्रयच नाहीं, तर काय जाणशील? मग साक्षित्वरहित तूंच राहशील कीं, जैसें–जंवपर्यंत पुढें तमाशा होतो, तंवपर्यंत दृष्टि पहाते; तमाशाच नाहीं. मग दृष्टीचें पहाणें कोठें? मग केवळ दृष्टीच आहे. ऐसें तरी आपुलें निजरूप समज. स्वसंवेद्य जागृति स्वप्नांत स्थूलसूक्ष्म प्रपंचाचा व्यवहार आहे, तंववर तुझी जाणीव आहे. तूं जाणतोस काय? कीं जेव्हां गाढनिद्रा लागते व व्यवहार लीन होतो, तेव्हां मग जाणीव कोठें राहते? ते वेळेस तूं कांहीं जाणत असतोस काय?

**शिष्य.**–ना जी.

**सद्गुरु.**–पुन्हा जागृति व्यवहार होऊं लागला असतां जाणूं लागतोस कीं. सुषुप्तीसही जाणतोस, आपणांसही जाणतोस कीं,

' सुखी होतों ' ऐसें. आतां मूढाचें अज्ञानावरण गेलें नाहीं, ह्मणोन तो आपणास सुषुप्तीच्या पर ऐसें जाणूं शकत नाहीं. बहिर्मुख होऊन वरळतो. तुझे ठायीं तर कारण अज्ञान नाहीं; तूं तर आत्म-

' महाकारण ' देहाचा स्वरूप जाणतच आहेस. आतां मनबुद्ध्यादि

निरास इंद्रियें लीन झालीं असतां तुझें साक्षित्व लीन होतें; आतां तूं यास सुषुप्ति कां ह्मणतोस? सुषुप्तीचा ग्रंथिभेद तर पहिलेच झाला आहे. आतां सुषुप्ति नाहींच. आतां यास सुषुप्ति ह्मणूं नको, समाधिच ह्मण. समाधिही ह्मणतां येत नाहीं. समाधींतही हटयो-ग्याचें मन लीन होतें, जाणीव लीन होती. निर्विकल्प असतां जर त्याचें अज्ञान गेलें नसलें तर ती सुषुप्तिच समजावी. मन अज्ञानां-तच लीन होतें, मग सावध झाल्यावर ह्मणेल ' सुखी होतों. ' निद्रिस्थवत्. सुषुप्तीपर आत्मबोध त्यास नाहीं. तुझ्या मनाचा लय झाला असतां जें साक्षित्व लीन होतें, नंतरची जे स्थिति त्यास सुषुप्ति ह्मणूं नको; समाधिही ह्मणूं नको. स्थिति ही बोलावयाची रीति. अरे, तेंच तुझें स्वरूप, तोच तूं आत्मा. स्वप्रकाश, सर्वज्ञ, स्वसं-वेद्य, वेद्यवेदकवर्जित असा मी साक्षित्वरहित ज्ञप्तिमात्र आहे, ऐसें तूंच आपणांस प्रत्यक्ष परमानंदस्वरूप जाणतोस. आतां सुषुप्ति ती कोठें सांग. अरे, अज्ञानाची सुषुप्ति; तेथेंही त्या सुषुप्ति अवस्थेचा साक्षी तूंच आहेस. तुझे ठायीं त्याचें ऐक्यज्ञान नाहीं. ह्मणून तो भिन्नत्वेंच देहाभिमानी होऊन मूर्खपणें व्यवहार करितो. तूं स्थूल सूक्ष्म कारण महाकारण हे चार देह, जाग्रत् स्वप्न सुषुप्ति तुर्या ह्या चारी अवस्था, विश्व तैजस प्राज्ञ प्रत्यगात्मा हे चारी अवस्थांचे अभिमानी यांहून भिन्न आहेस कीं. साक्षित्वरहित आपलें स्वरूप लवकर समजावें, ह्मणोन सुषुप्तीचा फोड करून दाखविलें एस आतांच समज. मी सर्वसाक्षी ऐशी जे जाणीव स्फुरते ती जाणीव

तर जड आहे. तुझ्या प्रकाशेंकरून ती प्रकाशित झाली; ह्मणून देह-त्रयासी जाणे तें त्या जाणिवेचें जें जाणीवरूप स्फुरण, त्याचेंही ज्ञान तर तुलाच आहे. जाणिवेचा प्रकाशक मीच आहे ऐसें. तूं समजलास कीं?

**शिष्य.**–जाणिवेचें जाणीवस्फुरणही मलाच कळतें तो मी आत्मा आहे. आतां ही जाणीव माझे ठायीं कां स्फुरते? समजलें कीं, देहत्रयाचे योगेंकरून स्फुरतें. देहत्रयाचा व्यवहार आहे ह्मणोन त्याचें साक्षित्व आहे. ऐसें समजोन देहत्रयाचें निराकारण केलें तर काय जाणेल?

**सद्गुरु.**–जेव्हां जाणीव तुझे ठायीं लीन होईल, तेव्हां महा-कारण सहजच गेलें. तीच साक्षिणी तुर्या होती, तीही सहजच नाहीं. तो प्रत्यगात्मा अभिमानीही नाहीं. साक्षित्वच लीन झालें, तेव्हां देहचतुष्टय मोडलें. मग जें राहिलें ज्ञानाज्ञानरहित, ज्ञप्तिमात्र, स्वसंवेद्य, वेद्यवेदकवार्जित तो तूंच कीं. स्वप्रकाश विशुद्ध ज्ञानस्वरूप कूटस्थ आत्मा, ऐसा ( अशा अशा प्रकारचा ) आहेस हें मी वाणी-करून कैसें सांगूं? यतोवाचोनिवर्तंते अप्राप्यमनसासहेति श्रुतेः। ( अर्थ.–मनासहित वाणी न पोंचतां जेथून परत येतात. ) तूंच आपआपणातें जाण, स्वानुभूत्यैक मान. अनुभवैकवेद्य ऐसें त्वां स्वानुभवेंकरून जाणिलें कीं, जें पूर्वीं जीवेश्वराहून भिन्न, तें मी विशुद्ध ज्ञानस्वरूप कसें आहे? तें शीवशिवरहित परात्पर विशुद्ध आपलें स्वरूप अनुभविलें ना?

**शिष्य बोले.**–" अनुभविलें. आणि ' अनुभविलें ' हा शब्द व अनुभवही माझे विशुद्ध ज्ञानस्वरूपीं साजत नाहीं. "

**सद्गुरु.**–भला बापा आतां हे चारी देह, यांच्या अवस्था व अभिमानी हे सर्व विशद करून सांगूं, तें ऐक.

| देह. | स्थूलदेह. | सूक्ष्मदेह. | कारणदेह. | महाकारणदेह. |
| --- | --- | --- | --- | --- |
| अवस्था. | जाग्रति. | स्वप्न. | सुषुप्ति. | तूर्या. |
| अभिमानी. | विश्व. | तैजस. | प्राज्ञ. | प्रत्यगात्मा. |
| स्थान. | नेत्र. | कंठ. | हृदय. | मूर्ध्नि. |
| वाचा. | वैखरी. | मध्यमा. | पश्यंती. | परा. |
| भोग. | स्थूल. | प्रविविक्त. | आनंद. | परमानंद. |
| मात्रा. | अकार. | उकार. | मकार. | अर्धमात्रा. |

ऐसा देहचतुष्टय या वेगळा तूं शुद्ध चैतन्य आहेस. हें देह चतुष्टय झालें नव्हतें, तेव्हांही तूं असाच ज्ञप्तिमात्र होतास; व हें झालें तरी तूं जशाचा तसाच आहेस. एतत्संबंधरहित हें म्हणजे हें नासलें तरी तूं जशाचा तसाच आहेस. तूं पूर्वीं जन्मला मेला नाहींस; आतांही जन्ममरण नाहीं; व पुढेंही जन्मणार नाहींस, मरणार नाहींस. तूं अव्यय, अचल, निरालंब सदा एकरूप आहेस ऐसें समजलें ना?

शिष्य बोले–होजी.

सद्गुरु.–अरे–कूटस्थमव्यक्तमचिंत्यरूपं नारायणंकारणमादिदेवं युगांतशेषं पुरुषं पुराणं तंवासुदेवं शरणं प्रपद्ये ॥ ५३ ॥ [ अर्थ.–जो कूटस्थ, अव्यक्त, व अचिंत्यरूप, ज्याला नारायण असें म्हणतात, जो सर्वांचें कारणस्वरूप व आदिदेव, सृष्टिप्रळयानंतरही राहणारा. आदिपुरुष, व पुराण अत्यंत प्राचीन ( अनादि ) अशा वासुदेवा प्रत मी शरण आहें. ] इत्यादि वचनांनीं ब्रह्मादिदेव तुझें स्तवन करितात, व तुलाच शरण आहेत कीं.

शिष्य–हो जी. परंतु, स्वामी कांहीं आणिक पुसतों तें सांगावें.

सद्गुरु.–तें काय रे?

शिष्य.–जी! हें मी तर समजलों कीं, ज्ञप्तिमात्र कुटस्थ आत्मा मी आहें. परंतु, शास्त्रोक्ति कीं, तो कूटस्थ 'अक्षर' बोलिजे. व ब्रह्म तर क्षराक्षरातीत आहे. कूटस्थोक्षर उच्यते। उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः। अक्षरादपि चोत्तम इति स्मृतेः (भ. गीता) ॥ ५४ ॥ [ अर्थ.–कूटस्थास 'अक्षर' असें ह्मणतात. (क्षर ह्म० नाशिवंत अक्षर ह्म० अविनाशी) उत्तम पुरुष ज्याला परमात्मा असें ह्मणतात, तो या दोन्ही–क्षर व अक्षर–पुरुषांहून निराळा आहे. अक्षर पुरुषापेक्षांही तो उत्तम आहे. ] ऐसें ह्मणतात. तेव्हां, अक्षर जो कूटस्थ त्याहून मी आणिक उत्तम पुरुष परमात्मा तो कसा? हें मज समजावें ऐशी कृपा करावी.

तंव तो पुन्हा बोधसिंधु हेलावोन बोलता झाला.

सद्गुरु.–बा रे, आतां येथून जी बोधपरंपरा ती केवळ शब्दाची वडामोडी. वस्तुतः कूटस्थाचा व ब्रह्माचा भेद नाहीं पुढें तर केवळ वाचारंभण पद्धतीकरून शब्दशास्त्रीचीच वृद्धि होऊन ग्रंथबाहुल्य होईल. कूटस्थब्रम्हाचा कांहीं वस्तुभेद नाहीं; नामभेदमात्र आहे. तेंच सांगूं.–कूटस्थ ब्रह्मणोर्भेदो नामतो नच वस्तुतः ॥ ५५ ॥ (अर्थ.–वरील वाक्यांत आहे.) आतां, जैसे वटाव-

१ द्वाविमौपुरुषौलोके क्षरश्चाक्षर एवच ॥ क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ (भ. गी. अ. १५ श्लो. १६)

प्रा० टी० (ओंव्या) हा लोक ह्मणिजे संसाराच्या ठायीं। हे दोनी पुरुष असती पाहीं। एकु क्षर एकु अक्षर नामें येहीं। समासही ऐसा असे ॥ २०७ ॥ क्षरतीति क्षरः ॥ जो कीं प्रतिक्षणीं असे नासत। कार्यराशी पुरुष ह्मणिजेत। आणि अविनाशी अक्षर तो नाशरहित। बीजनिश्चित क्षर पुरुषाचें ॥ ८ ॥ क्षर पुरुषाची जेणें होय उत्पत्ति। तें बीजभूत अक्षर पुरुष

च्छिन्न ह्मणून घटाकाश बोलिजेतें; व अनवच्छिन्न तें महाकाश, तैसेंच देहावच्छिन्न जें शुद्ध चैतन्य तें 'कूटस्थ' शब्दें बोलिजे तें; व देहादनवच्छिन्न शुद्ध चैतन्य तें 'ब्रह्म' बोलिजे तें. जैसें घटाकाश तेंच महाकाश, तैसेंच जो देहाधिष्ठान कूटस्थ तोच अनेक ब्रह्मांडाधिष्ठान ब्रम्ह आहे. कूटस्थ ब्रह्मांचा भेदच नाहीं. जो कूटस्थ तोच ब्रह्म. आतां कायरे म्हणतोस?

शिष्य.–तरी स्वामी क्षराक्षरातीत मी आत्मा ऐसें व्यवस्थापूर्वक समजलेंच पाहिजे.

सद्गुरु.–अरे, तर अधिष्ठानीं दृष्टि ठेवून ऐक. 'तत्वमसीति' महावाक्याचें विवरण करून तत्पदाचें शोधन सांगूं. आधीं सृष्टीचा क्रम सांगूं अन्वय ऐक. सृष्टींपूर्वी निर्विकल्प निरहं परब्रम्ह होतें जें, त्यास ब्रह्माहस्मीति ( मी ब्रह्म आहें अशी ) स्फूर्ति झाली. या स्फूर्तीचें नांव 'मूळमाया' 'आदिशक्ति' या शक्तीचा अंगिकार केला म्हणून 'शबल ब्रह्म' ऐसें नांव आलें. या मायेंत जें शुद्ध चैतन्याचें बिंब बिंबलें, तो त्या मायेचा आधीश मूळ पुरुष बोलिजेळा. येथोन श्रुतीचा उद्भव. ॐकाराचें आदिबीजस्थान हें. अथ 'एकाकी न रमते' इति श्रुतेः। अतएव एकोहं बहुस्यां प्रजायेयेति' श्रुतेः ॥ ५६ ॥ ( अर्थ.–एकटेपणामध्यें रमत नाहीं–सुख

सर्वार्थी । भगवंताची माया जियेतें ह्मणती । पुरुष बोलती अक्षर तो ॥ ९ ॥ आतां स्वयें श्रीभगवंतचि आपण । सांगती पुरुषद्वयाचें लक्षण । तरि प्रकृतीचें कार्यजात सर्वभूतें जाण । आकाशादि पूर्ण तो क्षर पुरुष ॥ ३१० ॥ आतां अक्षर पुरुष ते माया जाण । सर्व प्रपंचकार्यजाताचें जें कारण । कूटस्थ ह्मणती तिये लागुनी । तेहि खूण ऐसी असे ॥ ११ ॥ कूट ह्मणिजे जें सत्यवस्तूचें आच्छादन । करूनि, मिथ्याभूताचें करी प्रकाशन । ऐशीचि ते हे मायाचि जाण । अनर्थ संपूर्ण जे कीं देत ॥ १२ ॥ स्वस्वरूपाचें क-

वाटत नाहीं,–याकरितां आपण एकटाच * अनेकरूपानें नटावें, ) ह्मणजे येथें जग व्हावें ऐसी इच्छा झाली. ही दुसरी शक्ति. हिचें नांव अविद्या. हेंच अज्ञान बोलिजेनें. इणें स्वरूपास आवरण घातलें आतां ईश्वराचें प्रतिबिंब बिंबलें, त्या प्रकाशें ती प्रकाशित झाली. इतें पुढें कार्य करावयास सत्ता मागील ईश्वराची. विद्येच्या स्फूर्तींत बिंबला तो ईश्वर. अविद्योद्भव बुद्धींत प्रतिबिंब जें तो 'जीव' बोलिजेला. हीच अविद्या. तेच अव्याकृत बोलिजेती ज्यांचें अज्ञान गेलें नाहीं, ते प्रलयीं या मायेंत लीन होतात. अविद्येचे ठायीं संकल्प उठिला–जगद्रूपें मीच होईन. हा उर्ध्वमूलमधःशाख वृक्ष होणार. या वृक्षारूढ दोन सुपर्ण हे जे पूर्वीं सांगितले, ते विद्योद्भव स्फूर्तींत बिंबित 'ईश्वर,' व दुसरा अविद्योद्भव स्फूर्तींत प्रतिबिंबित 'जीव' हे दोन्ही सुपर्ण ( पक्षी. ) येथें श्रुति. द्वासुपर्णा सयुजासखाया समानंवृक्षं परिषस्व जाते । तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्यनश्नन्नन्यो अभिचाक-शीतीतिश्रुतेः ॥ ( अर्थ.–मागील ११ वें प्रमाण पहा. ) अविद्ये-पासून संकल्प उठिला कीं 'जगद्रूपें मीच होईन.' याचें नांव महत्तत्वादिकुर्वाणात्. महतत्वापासून अहंकार झाला. तो त्रिविध ( तीन प्रकारचा )–राजस, तामस, व सात्विक. यापासाव रज, सत्व

विद्या. अविद्या, ईश्वर व जीव.

रूनियां आवरण । विक्षेपें शरीरादि प्रपंच दाविजे संपूर्ण । आवरण विक्षेप शक्तिद्वयरूपें करून । राहे ह्मणून कूटस्थ ह्मणती ॥ १३ ॥ भगवन्माया-शक्तिरूप पुरुष जाण । कारणोपाधि संसारबीज ह्मणोन । आणि अनंत अंत नाहींच ययालागून । अक्षर पूर्ण ह्मणताती ॥ १४ ॥ अनंत उपाय करितां अधिक वाढतु । एकें ज्ञानावांचूनि नाहीं नासतु । ह्मणोनि अक्षर ऐसें यातें । ह्मणिजतु जाण निश्चितु अर्थ ऐसा ॥ १५ ॥

( रंगनाथस्वामीकृत चित्सदानंद लहरी टी० )

व तम हे तीन गुण झाले. या गुणापासून ब्रह्मा, विष्णु, महेश्वर झाले. आतां हे तीन देव येथें कर्तुमकर्ते. रजोगुणाची क्रियाशक्ति, सत्वगुणाची ज्ञानशक्ति, व तमोगुणाची द्रव्यशक्ति, क्रियाशक्तीपासून इंद्रियें झालीं; ज्ञानशक्तीपासून मन व देव झाले; आणि द्रव्यशक्तिपासून पंचमहाभूतें झालीं; नंतर चतुर्दश * भुवनांची रचना झाली. ऐशी समष्टिव्यष्टि मिळोन एकच ' विराट ' पुरुष. हा चेतना न पावे, तेव्हां मूळ पुरुष श्वासेंकरून प्रवेशला असतां विराट उभा राहून कार्यक्षम झाला. तस्माद्विराडजायतेतिश्रुतेः । जसे पिंडीचे देहचतुष्टय, तसे विराटदेहचतुष्टय. पाताळापासून सत्यलोकापर्यंत हा विराटस्थूल देह. पादतळ तें पाताल, पार्ष्णि महातल, रसातळ तलातल गुल्फ, सुतल जानू वितल अतल ऊरु, मही जघन, भुवर्लोक नाभी, स्वर्लोक उरस्थल, महर्लोक कंठ, जनोलोक वदन, तपोलोक कपाल, शिरः सत्यलोक, भ्रूभंग काल, नक्षत्रे दांत, हास्यमोहकरी माया, सृष्टि अपांग मोक्षण, निमिषोन्मेष दिवारात्री, समुद्र कुक्षी, नाडी नद्या, वृक्षौषधि रोम, वृष्टि रेत, अस्थि पर्वत ऐसें मिळोन विराट स्थूल देह.

अतां सूक्ष्म सांगूं.—विष्णु अंतःकरण, चंद्र मन, बुद्धि ब्रह्मा, चित्त नारायण, रुद्र अहंकार, दिशा कान, इंद्र हात, सूर्य चक्षु, वरुण जिव्हा, अश्विनीकुमार नासा, उपेंद्र पाद, गुद मृत्यु, प्रजापति शिश्न, वायु प्राण, ऐसें मिळोन सूक्ष्म शरीर देवतामय; यास हिरण्यगर्भ ह्मणतात.

जी पूर्वी अविद्या माया सांगितली, ती कारण अव्याकृत बोलिजेते.

* अतळ, वितल, सुतळ, तलातल, रसातळ, महातळ, व पाताळ हीं ७ भुवनें (लोक) व भूर, भुवर, स्वर, महर, जन, तप, व सत्य लोक एकूण १४ भुवनें.

मूळमाया सांगितली तें महाकारण.

जें हें स्थूळदेह मनुष्याचें तो विराटच समज. हिरण्यगर्भ तेंच येथें सूक्ष्म समज. जी ती माया अविद्या ते येथें पिंडीं ( देहांत ) कारण समज. जी मूळमाया तीच येथें तूर्या आहे. जो तेथें सर्वेश्वर तो येथें प्रत्यगात्मा. असें हें सर्व एकच आहे. देहाधिष्ठान शुद्ध चैतन्य तेंच ब्रह्मांडाधिष्ठान शुद्ध चैतन्य. जैसा या देहचतुष्टयाचा निरास केला, तैसा विराट देहचतुष्टयाचा निरास कर, ह्मणजे सहजच कळों येईल. एक, ऐसें व्यतिरेकें पहा काय अवशिष्ट राहतें ते. तो व्यतिरेकच सांगूं. ज्या अन्वयें सृष्टि झाली, त्या अन्वयेंच जेथील तेथें निमाली—पृथ्वी जळांत लीन झाली, जल अग्नींत, अग्नि वायूंत, वायु आकाशांत, आकाश द्रव्यशक्तींत, द्रव्यशक्ति तमोगुणांत; ऐसेंच रजःसत्वही एकमेकांत मिळोन तमोगुणीं लीन झालें. तमोगुण अहंकारीं लीन झाला, अहंकार महत्तत्वीं, व महत्तत्व मायेंत लीन झालें, विराट व हिरण्यगर्भ हे दोन्ही देह तर इतक्यांतच नाहींसे झाले. आतां ती माया मूळमायेंत लीन झाली, तिसरा देह नासला. मूळमाया परब्रह्मीं लीन झाली, चवथा देह नासला-शबलत्व गेलें. नंतर, आतां जें राहिलें वर्तुलकोणविभागरहित, दिग्विभागरहित, अधऊर्ध्वविवर्जित, अपार, निरालंब, तें अवशिष्ट; याहून पर कांहीं नाहीं. हेंच हें; यास ' चिदाकाश परब्रह्म ' ऐसें ह्मणतात. तेंच सांगूं. यस्मात्परतरं नान्यन्नेतिनेती तिवै श्रुतिः

( ज्याच्याहून पलीकडे अथवा श्रेष्ठतर असें कांहीं कांहीं नाहीं. )

आतां जें राहिलें तें ' तत्पद ' बरें. कूटस्थ चैतन्य तें शुद्ध ' त्वंपद ' आतां ' असिपद ' ह्मणजे ऐक्यता ह्म० जे कूटस्थ तेंच ब्रह्म ऐसें समजणें.

येथें शास्त्रपद्धति ती अशी कीं, इकडे जहल्लक्षणा संभवत नाहीं; एकात्मकत्व आहे ह्मणून अजहल्लक्षणें करून विरोध येतो; याकरितां ती ऐक्यता जहदजहल्लक्षणें करून जाणावी. असिपदैक्य जाति कशी ती सांगतों. ' जहदजहद् ह्मणजे कांहीं त्याग व कांहीं अत्याग; येथें त्वंपदवाच्यांशाचा त्याग करावा, व तेथीलही तत्पदवाच्यांश त्यागावा. कां, द्वैतनिरास झाला, मग राहिलें तें त्वंतत्. ऐशा पदेंकरून वाच्य चैतन्य झालें. जेव्हां द्वैतानुत्पत्तीच आहे, तेव्हां शुद्ध चैतन्यास त्वंतत्पदेंकरून कोणवाच्य करील? वास्तव चैतन्यास त्वंपदवाच्यत्व व तत्पदवाच्यत्व हीं नाहीं. ह्मणोन त्वंपदवाच्यत्वाचा व तत्पदवाच्यत्वाचा त्याग करून जें त्वंपदलक्ष्य चैतन्य तेंच तत्पदलक्ष्य चैतन्य ब्रह्म आहे. ऐसें उभयपदवाच्यत्वाचा त्याग करून उभयपदलक्ष्य एकच ऐसें समजणें, या नांव ' असिपद. '

१ शास्त्रांत तीन प्रकारच्या लक्षणा सांगितल्या आहेत. जहल्लक्षणा, अजहल्लक्षणा आणि जहदजहल्लक्षणा. ( 'वाच्यार्थ' ह्मणजे रूढीनें आलेला केवळ शब्दाचा जो अर्थ तो; व ' लक्ष्यार्थ ' ह्मणजे शब्दाचा वरवर दिसणारा अर्थ सोडून त्यांत असलेला जो गुह्यार्थ गर्भितार्थ चातुर्यानें घ्यावा लागतो तो. जेव्हां, केवळ वाच्यार्थानें वाच्याचा अर्थसंभव योग्य रीतीनें होत नाहीं, तेव्हां कांहीं विशेष प्रकारानें लक्ष्यार्थ ह्मणजे गर्भितार्थ जाणावा लागतो, त्या प्रकारास लक्षणा असें ह्मणतात. ) वाक्याचा खरा अर्थ करतेवेळीं, जेव्हां वाच्यार्थाचा अगदींच त्याग करून केवळ लक्ष्यार्थ मात्र घ्यावा लागतो, तेव्हा त्या लक्षणेस ' जहल्लक्षणा ' असें ह्मणतात. उदाहरण— ' गंगायां घोषा वर्तन्ते ' ह्म० ' गंगेवर गवळ्यांचीं घरें आहेत ' येथें ' गंगा ' या शब्दाचा वाच्यार्थ ' प्रवाह ' किंवा ' पाणी ' याचा त्याग करून, त्या ( गंगा ) शब्दाचा लक्ष्यार्थ ' तीर ' ( कांठ ) हा घेतला पाहिजे. तरच अर्थ संभव होईल. ह्म० ' गंगातीरावर ग० घरें आहेत. ' असा अर्थ संभवेल. आणि वाच्यार्थाचा त्याग न केला तर ह्म० गंगा शब्दाचा गंगा तीर असा अर्थ न केला तर विरोध उत्पन्न होतो. कारण ज्या प्रवाहावर

गवताची काडी देखील ठरत नाहीं, त्यावर घरें कशी राहूं शकतील? अर्थात् हा विरोध ठरतो. या करितां हा विरोध जाण्यासाठीं वाच्यार्थ टाकून लक्ष्यार्थ घेतला पाहिजे. याला 'जहल्लक्षणा' असें ह्मणतात. दुसरे— वाक्याचा अर्थ करतेवेळीं, जेव्हां त्यांतील शब्दाचा वाच्यार्थ व लक्ष्यार्थ न टाकितां दोन्ही घ्यावे लागतात, तेव्हां त्या लक्षणेस 'अजहल्लक्षणा' असें ह्मणतात. उदाहरण—'शोणो धावति' शोण ह्म० तांबडा रंग, व धावति ह्म० धांवतो. येथें, रंगास धांवणें संभवत नाहीं, याकरितां तो गुणविशिष्ट ह्म० 'तांबड्या रंगाचा घोडा' अगर 'तसला दुसरा कोणताही पशु वगैरे धांवतो' असा अर्थ केला पाहिजे. दुसरें उदाहरण—'काकेभ्यो दधि रक्षताम्' ह्मणजे 'कावळ्यापासून दह्याचें रक्षण करावें' येथें 'काक' या शब्दाचा अर्थ फक्त 'कावळाच' असा न करितां दह्याचा नाश करणारे इतर मार्जारादी प्राणी देखील त्यांत घेतले पाहिजेत, ह्मणजे वाक्यार्थ बरोबर जुळेल. अर्थात् येथें वाच्यार्थ व लक्ष्यार्थ दोन्ही घेतलें पाहिजेत. याला 'अजहल्लक्षणा' असें ह्मणतात. तिसरी 'जहदजहल्लक्षणा' ह्मणजे वर मूळ ग्रंथांत सांगितल्याप्रमाणें कांहीं त्याग व कांहीं अत्याग करून वाक्यार्थ संपादावा लागतो; त्यास 'भागत्यागलक्षणा' असेंही नांव आहे. उदाहरण—'सोऽयं देवदत्तः' ह्म० 'तो हा देवदत्त' (देवदत्त हें एका पुरुषाचें नांव.) याचें स्पष्टीकरण असें कीं—त्या देशांत, त्या कालांत, त्या वयांत, त्या आश्रमांत, जो पाहिला, तोच या देशांत, या कालांत, या वयांत, या आश्रमांत हा देवदत्त ओळखिला. येथें भाग त्याग लक्षणेंवांचून ऐक्य घडत नाहीं. कारण, तो देश, तो काल, ते वय व तो आश्रम हे वेगळे; व हा देश, हा काळ, हें वय व हा आश्रम हे वेगळे. या करितां 'तो' व 'हा' या दोन्ही वाच्यार्थांचा त्याग करून एक पुरुषव्यक्ति लक्षितां येते. त्या प्रमाणें महावाक्यांत मायोपाधिक सर्वज्ञत्वादि गुणविशिष्ट ईश्वर हा तत्पदाचा वाच्यार्थ, व अविद्योपाधिक किंचिज्ज्ञत्वादि गुणविशिष्ट

जीव हा त्वंपदाचा वाच्यार्थ, या दोघांत वैरुद्धच असल्यामुळें, त्याचा ( त्या उभय वाच्यार्थाचा ) त्याग करून त्यांतील एक अखंड चैतन्य ( सच्चिदानंदरूप ) लक्षितां येतें. तात्पर्य, सर्वज्ञत्व व किंचिज्ज्ञत्व या शुद्धज्ञानाच्या ( केवळ चैतन्याचा ) दोन्ही उपाधि होत. ह्म० या दोघांमध्येंही केवल 'ज्ञान' ह्मणतात तें एकच आहे, असें जाणावें. आचार्यांनीं 'विवेक चूडामणी' ग्रंथांत असेंच ह्मटलें आहे. श्लोक-**सदेवदत्तोऽयमितीह वैकता विरुद्ध धर्मांशमपास्य कथ्यते ॥ यथा तथा तत्वमसीति वाक्ये विरुद्धधर्मानुभयत्र हित्वा ॥ २५० ॥ संलक्ष्य चिन्मात्रतया सदात्मनोरखंडभावः परिचीयते बुधैः ॥ एवं महावाक्यशतेन कथ्यते ब्रह्मात्मनो रैक्यमखंडभावः ॥ ५१ ॥** भावार्थ.-ज्याप्रमाणें 'तोच हा देवदत्त' या वाक्यांतील विरुद्ध धर्मांशाचा ( ह्म० तो व हा यांचा ) त्याग करून त्यांतील ऐक्यभाव ह्मणजे देवदत्तरूप व्यक्तीचें एकत्व सांगितलें जातें, त्याप्रमाणेंच 'तत्वमसि' या वाक्यामध्यें तत् शब्दाचा वाच्यार्थ ईश्वर व त्वं शब्दाचा जीव यांच्या विरुद्ध अंशाचा ह्म० सर्वज्ञत्व व किंचिज्ज्ञत्व यांचा त्याग करून दोघांमध्यें सामान्यरूपानें असणारें जें एक केवळ चैतन्य त्याचा ज्ञानीलोक अनुभव घेतात. याप्रमाणें शेंकडो महावाक्यांनीं आत्मा व ब्रह्म यांचा अखंड ऐक्यभाव सांगितला आहे. याप्रमाणेंच जहदजहल्लक्षणेनें जीवशिवाचें ऐक्य जाणण्याविषयीं श्रीरामगीतेंतही सांगितलें आहे. ( श्लोक ) **एकात्मकत्वाज्जहती न संभवेत् तथाऽजहल्लक्षणया विरोधतः ॥ सोयं पदार्थाविव भागलक्षणा युज्यत तत्त्वं पदयोरदोषतः ॥ २७ ॥** भावार्थ-एकात्मकत्व असल्यामुळें जहल्लक्षणा संभवत नाहीं व विरुद्धत्वामुळें अजहल्लक्षणा संभवत नाहीं. तर 'तो हा पदार्थ' या वाक्याप्रमाणें भाग त्याग लक्षणेनेंच जीव शिवाचें ऐक्य जाणलें पाहिजे. इत्यादि.

# ब्रह्मांड अथवा समष्टिदेहांचें कोष्टक.

| देह. | विराट. | हिरण्यगर्भ | माया. | मूलमाया. |
|---|---|---|---|---|
| अवस्था. | उत्पत्ति. | स्थिति. | प्रलय. | सर्वसाक्षी. |
| अभिमानी. | ब्रह्मा. | विष्णु. | रुद्र. | सर्वेश्वर. |
| स्थान. | सूर्य. | वैकुंठ. | कैलास. | कैवल्य. |
| वाचा. | वैखरी. | मध्यमा. | पश्यंती. | परा. |
| भोग. | स्थूल. | प्रविविक्त. | आनंद. | परमानंद. |
| मात्रा. | अकार. | उकार. | मकार. | अर्धमात्रा. |

आतां हें चैतन्य असिपदवाच्य. परंतु तें असिपदवाच्यत्वही नाहीं. कारण पदद्वयवाच्यत्वाचाच त्याग; तेव्हां शुद्धचैतन्यास असिपदवाच्यत्व कशाचें? आतां ( अर्थात ) असिपदवाच्यत्व नाहीं. तथापि, असिपदलक्ष्य ह्मणावें तर, पदत्रयवाच्यत्वच नाहीं, तेव्हां असिपद लक्ष्य ह्मणणेंही नाहीं. आतां जें पदातीत, वाच्यलक्ष्य ह्मणणें रहित, स्वयंकैवल्य, सजातिय-विजातिय स्वगतभेदरहित, द्वैताद्वैतविवर्जित, अपार, निरालंब, स्वप्रकाश, विशुद्धज्ञानस्वरूप, स्वानुभूत्येकमान, निरहंकार, भावाभावप्रत्ययहीन, सर्वभाव विवर्जित, स्वसंवेद्य, वेदकवर्जित, सदैकरूप, अव्यय, अविनाशी, व्याप्यव्यापकवर्जित, अचल, परमानंद, कैवल्य परब्रह्म तूं आहेस. आतां समजलें?

शिष्य.–जी! पहिल्यापासून समजूनच आहे. ऐसा आहे, ऐसें नव्हे, समजलें कोणी ह्मणावें? जसा मी कैवल्यपरब्रह्म आहे, तसाच मी कैवल्य परब्रह्म आहे.

गुरु.–शाबास! जयजय तूं परब्रह्म. तुझी स्तुति कवणें क-

रावी ? आतां निरंतर आनंदमय खुशाल रहा. ) श्लोक ) **मनो न बुद्धिर्न शरीरमिंद्रियं तन्मात्र भूतानि न भूतपंचकं ॥ अहंकृतिश्चापिन चित्स्वरूपकं तमीशमात्मानमुपैमि शाश्वतम् ॥ ५७ ॥** ( अर्थ.-जो मन नव्हे, बुद्धि नव्हे, शरीर, इंद्रियें, विषय अथवा पंचभूतेंही जो नव्हे, किंवा या सर्वांस कारणभूत अहंकृतीही जो नव्हे; तर जो चित्स्वरूप म्ह० केवळ ज्ञानस्वरूप आहे त्या प्रत मी निरंतरचा एकरूपानें मिळतों. ) **आतां तुझी कांहीं जगत् उदयें करून वृद्धि नाहीं,** किंवा **जगत्क्षयेंकरून हाणीही नाहीं. तदेवाह** ( म्ह० तेंच सांगतो— ) **मय्यनंतमहांभोधौ विश्ववीचिः स्वभावतः ॥ उदेतुवास्तमायातु न मे वृद्धिर्न मे क्षयः इति ॥ ५८ ॥ अर्थ.**—नाशरहित किंवा पाररहित अशा मत्स्वरूप महासागरामध्यें जगत्स्वरूप लहरीचा उदय होवो, किंवा अस्त होवो, त्यायोगानें मला वृद्धि अथवा क्षय दोन्हीं नाहींत. ) अर्थात् **तुला जन्म नाहीं, मरण नाहीं. नहिदेशकालाद्यनवच्छिन्नस्य जन्ममृत्युसंभवत इति चित्तोन्मेषनिमेषाभ्यां जगतश्चोदयक्षयावित (५९.)** **अर्थ**—जो आत्मा देशकालवस्तुपरिच्छेदरहित, त्यास जन्ममृत्यु संभवत नाहींत. चित्ताच्या उदयक्षयापासून जगताचा उदय व क्षय होतो,[1] वस्तुतः आत्मस्वरूपीं जगताचा अभाव आहे. ) आतां **जन्ममरण** ह्मणजे **काय तें सांगू.-तूं जशाचा तसाच असतां जन्म पाहून घे, व प्रत्यक्ष मरणही पहा. ज्यास इंद्रादिक देव, ऋषी व मोठमोठे मुनीही भीतात,**

---

१ ( ओंव्या )—अगा जगाचा कर्ता हें मन । मनेंचि जग भासे संपूर्ण । मनेंचि नासे जगाचें भान । नाहींच जाण होतसे ॥ अगा मनोदयें उदय जगासी । ह्मणोनी जगाचें कर्तृत्व मनासी ।. आपुलेनि संकल्पें प्रपंचासी । निश्चयेंसीं करीतसे ॥ मनें भाविलिया जग भासे । मनें न भाविलिया कांहींच न दिसे । यालागीं मन कर्ता ऐसें । बोलिलें असे जानकीनाथा ॥

( रंगनाथी योगवासिष्ठसार मनोलय प्रकरण ओं० १२२–१२४ )

तो मृत्यु काय आहे ऐसें ( हें ) आपल्या देखत पहा. मृत्युला मारून सुखी रहा. मनाचा उदय हाच जन्म होय. मन कर्मप्रेरित ज्या ज्या विषयावर धांवत, तत्तद्रूपयरूप हाऊन बसत. या मनाला चिदात्म्यतेंकरून आत्मा 'तेंच मन मी' ऐसें मानितो; तेंच मी ऐसें मानून तद्गत बंध आपले ठायीं आरोपित करितो; तद्गत संकल्प मी, कांहीं माझें, सुख, दुःख, इत्यादि अनेक देहरूप संकल्प करितें, व तत्तदाकार होतें; आत्मा तत्तदात्म्य पावून तत्संकल्परूप होऊन, देह पुत्र दारा गृह वित्त मी, कोणी अमूक नामरूपात्मक मी आहे, ऐसें मनःसंकल्पें बद्ध होऊन जागृत्स्वप्न प्रपंच व्यवहार करणें या नांव जन्म. तदेवाह ( तेंच सांगतों- ) **मन एवाहि संसारो बंधश्चैव मनःशुभे । आत्मा मनःसमानत्वमेत्य तद्गतबंधभाक् ॥ ६० ॥** ( अर्थ- मनच संसार, बंध तो मनाच्याच ठायीं, आत्मा मनरूप होत्साता तद्गत बंधाप्रत पावतो. ) **किंच, यनोयतो धावति कर्मचोदितं प्रपद्यमानः सहतेन जायते इति [ प्रपद्यमानः तदेवाहमितिमन्यमानः ] ॥ ६१ ॥** अर्थ–कर्मानें प्रेरणा केल्यामुळें मन जिकडे जिकडे धावतें तिकडे तिकडे हा तादात्म्य पावणारा ह्म० तेंच मी असें मानणारा तत्तदाकार होऊन जातो. )

२ ह्मणोनी मनाच बद्धतेकरून । जीवासीहि होय बंधन । मन मुक्त वासकरून । तेंचि मुक्तपण जीवाचें ॥ अथवा जीवाच्या बंधमोक्षाप्रती । मुख्य मनचि कारण गा रघुपती । मनोबंधें जीवासी बंधप्राप्ती । मुक्तत्वें मुक्ति तत्वतां ॥ ( रं. यो. वा. म. ल. प्र. ओं० १६१–१६२ )

तसेंच–मनाचा बलात्कार कैसा । निर्गुण पाडी गुणाचे फांसा । लावूनि जीवपणाचा झासा । संसार वळसा आवर्ती ॥ नवल मनाचें विंदान । शुद्धा उपजवी मीपण । तेचि वस्तूसी जीवपण । सगुणत्वा जाण स्वयें आणी ॥ जीवाचा आप्त आवश्यक । सुहृद सखा परमात्मा एक । तो मना जीवांचा नियामक । द्रष्टा देख साक्षित्वें ॥ अविद्या प्रतिबिंबा नेटका । जीव जो कां

आतां मृत्यु ह्मणजे—हा मी कोणी अमुक नामरूपात्मक आहे, त्याचा आत्यंतिक नाश होणें यास मूढ मृत्यु झाला ऐसें मानितो; यासच मरण ह्मणतात. तें मरण कसें होतें तें सांगूं—हे प्रसिद्ध पंच-प्राण स्थानें सोडतात, तेव्हां वाक्श्रोत्र शब्दविषयासुद्धां अंतःक-रणीं लीन होतात, अंतःकरण व्यान प्राणाचे ठायीं लीन होतें, वाक्पाणि स्पर्श-विषयासहित मनाचे ठायीं लीन होतात, मन समा नाचे ठायीं लीन होतें; चक्षुः पाद रूपविषयासहित बुद्धीचे ठायीं लीन होतात, बुद्धि उदानाचे ठायीं लीन होते; जिव्हा उपस्थ रस-विषयासहित चित्ताचे ठायीं लीन होतात, चित्त प्राणाचे ठायीं लीन होतें; घ्राणगुद गंधविषयासहित अहंकाराचे ठायीं लीन हो-तात, अहंकार अपानाचे ठायीं लीन होतो; अपान प्राणाचे ठायीं लीन होतो; प्राण उदानाचे ठायीं, उदान समानाचे ठायीं, समान व्यानाचे ठायीं, आणि व्यान क्रियाशक्तीचे ठायीं लीन होतो. मग देह निचेतन पडतो. या ऐसेयास अज्ञानी मृत्यु झाला—मेला असें ह्मणतात. पूर्वींच अज्ञान गेलें असलें तर परब्रह्मीं मिळतो. नाहींतर पुनः जन्ममरणास अधिकारी होऊन चौऱ्यांशीं लक्ष योनी फिरतो. हें मरण तर त्वां डोळ्यानेंच पाहिलें. मृत्यूसही मारून तूं तर जि-ताच आहेस. आतां तुझें काय जाईल? तूं जाणतच आहेस.

शिष्य.—देहादि प्रपंच झाला नव्हता, तेव्हां मी नानाज्ञान-

माझा सखा । तो मनोभ्रमें भ्रमोनि देखा । भोगी सुखदुःख मनोजन्य ॥ मनाची एकात्मता परम । जीवासी पडला थोर भ्रम । आपण असतांही निष्कर्म । कर्माकर्म स्वयें भोगी ॥ मुळीं जीव मनाचा नियंता । तोचि मनाच्या एकात्मता । मनाचिया सुखदुःखव्यथा । आपले माथां नाथिल्या सोशी ॥

( ए. भागवत अ० २३, ओं० ६१७।२२।२७।२८।२९।३०।३१ )

रहित असाच होतों. हा ( देहादि प्रपंच ) झाला तरी मी असंग निरुपाधि तसाच आहे. हा ( देहादि प्रपंच ) नसला तरी मी ज्ञप्ति-मात्र जशाचा तसाच आहे.

गुरु—तुझे ठायीं हे सहस्रावधी सुर नर मरमरून जातात. ते मेल्यानंतर त्यांत जें ज्ञप्तिमात्र सुखरूप व्यापक आहे, तें ( तत्व ) तर तूंच जशाचा तसाच असतोस. जैशीं तीं सहस्रावधी शरीरें झालीं—मेलीं, तरी तूं व्यापक जशाचा तसाच आहेस. तैसेंच ( त्या-प्रमाणें ) हेंही शरीर मेलें, तरी तूं तसाच येथेंही आहेस. तुझ्या स्वरूपीं जैशीं इतर अनेक शरीरें, तैसें हेंही एक समज. त्यांतच तूं सर्वत्र समच आहेस. समानाग स्माम्सशाक इात श्रुतः चेष्ट-मानं शरीरं स्वंपश्यत्यन्यशरीरंवदिति । अरे ज्यास मेले म्हणती, तेथें जें भावाभावप्रत्ययहीन, आनंदरूप विशुद्ध ज्ञान ज्ञप्ति-मात्र जें आहे, तें तर अनादि परब्रम्ह तूं तसाच आहेस. सदा सर्वदा हें तुला टाऊकच आहे. आतां मरतें कोणरे? मरण काय असतें तें तर सांग पाहूं.

तंव शिष्य खुशाल होऊन बोलता झाला—" जी! जन्म आणि मरण कांहीं पदार्थच नाहीं. नाहींच तें, ऐसें माझ्या प्रत्यक्ष प्रत्ययास आलें, मला पुरतें समजलें. "

सद्गुरुरुवाच ( सद्गुरु ह्मणाले )—तेंच सांगूं. हृदयाकाश-

१ ( ओंव्या ) याही देहास जाणणें । ऐसेंचि सर्व देहातें पाहणें । तरी एकदेही आपण । मानावें कां हो ॥ जाणता एका शरीरा । तैसाचि जा-णतो सचराचरा । वृथा धरूनि अहंकारा । मी देह कां हो मानावें ॥ शरीर मी ऐसी प्रतीति । हे तों रज्जुसर्पाची भ्रांती । जे प्रतीति आतां दिगंतीं । हुडकितांही न सांपडे ॥

( निगमसार, अ. ७, ओं० ६१।६२।६३.

**मात्रस्य देहनाश उपस्थिते । व्यर्थं तमनुशोचंति नष्ट आत्मेति शंकया इति ॥ ६२ ॥ न जायते न म्रियते कश्चित्किंचित्कदाचनेति ॥ ६३ ॥ आकाशादपि विस्तीर्णः शुद्धःसूक्ष्मोऽव्ययः शिवः॥ य आत्मा स कथंराम जायते म्रियतेऽथवा ॥ ६४ ॥ किंच, कदाचिदात्मा न मृतो न जायते न क्षीयते नापि विवर्धतेऽमरः ॥ निरस्तसर्वातिशयः सुखात्मकः स्वयंप्रभः सर्वगतोऽयमद्वयः ॥ ६५ ॥ घटादिषुप्रणष्टेषु यथाकाशमखंडितं । तथादेहेषु नष्टेषु देही नित्यमलोपक इति ॥ ६६ ॥ न जायते न म्रियते न निवृति न गच्छतीति । आत्मा न म्रियते जातु जायते नच वर्धते । षड्भावरहितोनंतः सत्यःप्रज्ञानविग्रह इति ॥६७॥**

**अर्थ.**–जीवानें धारण केलेल्या देहाचा नाश झाला असतां आत्म्याचा ह्म० आपलाच नाश झाला, अशा संशयानें व्यर्थ शोक करितात. ॥६२॥ आत्मा जन्म पावत नाहीं व त्याचा कधींही किंचित् देखील नाश होत नाहीं. ॥ ६३ ॥ आकाशापेक्षांही विस्तीर्ण, शुद्ध, सूक्ष्म, अव्यय व शिवस्वरूप असा आत्मा जन्म व मृत्यु कसा पावेल? ॥ ६४ ॥ आत्मा कधींच मेला नाहीं, नवीन उत्पन्न होत नाहीं, क्षय पावत नाहीं व वाढतही नाहीं; तो नित्य अमर आहे. तो सर्व सुखात्मक, स्वप्रकाश, सर्वगत व अद्वय आहे. इत्यादि ॥ ६५ ॥ घट नाश पावले असतां त्यांतील आकाशाचा जसा कांहींच नाश होत नाहीं, तद्वत् देहाचा नाश झाला असतां आत्म्याचा नाश होत नाहीं. तो नित्य व निर्लेप आहे. इ० ॥ ६६ ॥ आत्मा जन्म पावत नाहीं, व कधींच मरत नाहीं, तो कोठें जात नाहीं व येतही नाहीं, तो वृद्धि पावत

१ ( १ ) **जायते** ह्म० उत्पन्न होणें, ( २ ) **अस्ति** ह्म० उत्पन्न झाल्याप्रमाणे असणें, ( ३ ) **वर्धते** ह्म० वाढणें, ( ४ ) **विपरिणमते** ह्म० परिणाम पावणें, ( ५ ) **अपक्षीयते** ह्म० क्षीण होणें, व ( ६ ) **नश्यति** ह्म० मरणें नाश पावणें, यांस **षड्भावविकार** ह्मणतात. हे विकार देहादिकास आहेत; आत्म्यास नाहींत.

नाहीं. तो षड्भावरहित असून अनंत व सत्यज्ञानानुभवस्वरूप आहे. इत्यादि ॥ ६७ ॥

**शिष्य** बोले—" जी! मी जो आहें, तो तर जशाचा तसाच आहें मग होतें जातें हें तरी काय?

**गुरु.**—अरे! चाचपून तर पहा—हें काय आहे ऐसें. जितकें नामरूपात्मक जग, तितकें स्वपरज्ञानरहित जड आहे. सर्वांत व्यापक स्वपरज्ञानवान् चैतन्य तूंच आहेस. तुझेंच राज्य आहे; शोधून पहा—तें नामरूपात्मक जग आहे किंवा नाहीं? येथें जो कोणी ' विष्णुदत्त ' आपणहून ( आपण होऊन ) वागत होता, तो नाहींच ऐसें प्रत्ययास आलें?

**शिष्य.**—हो ( होय. )

**गुरु.**—जैसें, जेथें हा विष्णुदत्तनामा कोणीच नाहीं, ( नसून ) तूंच परब्रह्म आहेस; तैसेंच ब्रह्मादिदेव, असुर, नर, पशु, पक्षी, कीट इत्यादिकांचे ठायीं आपआपणांस तुजहून भिन्न आहे. अमुक ऐशी प्रतीती करून मानीत आहेत, ते कोणीच नाहींत, ऐसेंही समजलें?

**शिष्य.**—हो जी! ( होय महाराज. )

**गुरु.**—हाच तूं व्यापक आहेस.

**शिष्य.**—हो.

**गुरु.**—आतां जीव धारक तुज वेगळा कोणी नाहीं, ऐसें समजलें?

**शिष्य.**—हो जी!

**गुरु.**—आतां आकार मात्र दिसतो. गिरि कानन स्वर्गादि लोक हेही पहा. ते सर्व पंचभूतांचे आकार आहेत. जैसें सर्व जीवधारक नाहींत ऐसें पाहिलें, ऐसें याही पांच पुतळ्यास उभे करून

पहा. पृथ्वी आपणास पृथ्वी ऐसें मानीत होता, ती कोणीच नाहीं, तूंच आहेस. जेव्हां पृथ्वीच नाहीं, तेव्हां पृथ्वीचें कार्य स्वर्गादिक आकार सहजच नाहीं. ऐशीं चारी भूतें शोधून पाहिलीं, तीं नाहींच एशीं प्रत्ययास आलीं; तेथेंही तूंच आहेस. त्यांचीं कार्यें आकार सहजच नाहींत, हेंही समजलें कीं?

शिष्य.–हो जी!

गुरु.–वंध्येस पुत्रच नाहीं, तेव्हां नातू कशाचा? पंचभूतेंच नाहींत, तेव्हां त्यांचीं कार्यें नामरूप आकार हीं सर्वथा नाहींतच कीं.

शिष्य.–हो जी!

गुरु.–तूं ह्मणत होतास 'मी आहें,' तो तर जशाचा तसाच आहे. मग होतें जातें दिसतें ते काय?

शिष्य.–कांहींच नाहीं.

गुरु.–ऐसें समजलें? बरें आतां सांग तुझ्या वेगळें कोणतें रूपनाम दिसतें तें. बोट लावून सांग. तुला शपथ आहे. खरें सांग.

शिष्य.–जी स्वामी! आपले चरण साक्ष आहेत. मज आपले स्वरूपावेगळें नामरूप कोठेंही दिसत नाहीं.

गुरु.–तेंच सांगूं.–" ॐमिति गदितं गगनसमं तत्र परापरसारविचार इति ॥ अविलास विलास निराकरणं कथमक्षरबिंदुसमुच्चरणम् ॥ ६८ ॥ गगनं पवनो नहि सत्यमिति धरणीदहनो नहिसत्यमिति ॥ यदि चैकनिरंतर सत्यशिवं जलदश्च कथं सलिलंच कथम् ॥ ६९ ॥ ब्रह्मादयः सुरगणाः कथमत्रसन्ति स्वर्गादयो वसतयः कथमत्रसन्ति ॥ यद्येकरूपममलं परमार्थ तत्त्वं ज्ञानामृतं समरसं गगनोपमोहं ॥ ७० ॥ दहनपवनहीनं विद्धि विज्ञानमेकं धरणिजलविहीनं विद्धि विज्ञानमेकं ॥ अखिलग-

**गगहीनं विद्धि विज्ञानमेकं " गगनमिव विशालं विद्धि विज्ञानमेकम्** ॥ ७१ ॥ ( **भावार्थ**—गगनाप्रमाणें विशाल, व्यापक व निमळ, जें ' ॐ ' या संज्ञेनें वर्णिलें आहे, तें परापरसारविचाररूपी कसें होईल? विलास अथवा अविलास यांचेंहि जेथें निराकरण होतें, तेथें अक्षर व बिंदु यांचा उच्चार कसा होणार? ॥ ६८ ॥ आकाश व वायू हीं सत्य नाहींत, पृथ्वी व अग्नि हींही सत्य नाहींत, जर सर्वकाळ एक (भरीव) सत्य शिवस्वरूप केवळ चैतन्यच आहे, तर तेथें मेघ अथवा पाणी कोठलें? ॥ ६९ ॥ जर विमळ, परमार्थ तत्वरूप, ज्ञानामृत समरसरूप, गगनासारखा विशाल-खालवर, अजूबाजूनें, शुद्ध, मी एकच भरलों आहें, तर त्यास्वरूपीं ब्रह्मा-दिक देवगण कसे व कोठें असतील? स्वर्गादिक चतुर्दशभुवनें कशीं व कोठें राहतील? ॥ ७० ॥ तेज व वायू विरहित एक विज्ञान—चैतन्यच सर्व ठि-काणीं भरलें आहे असें जाण; पृथ्वी व आप विरहित एक विज्ञान चैतन्यच सर्व ठिकाणीं भरलें आहे असें जाण; तसेंच आकाश तत्वविरहित पण आकाशासारखें विशाल, शुद्ध विज्ञानच सर्वत्र आहे असें जाण. ॥ ७१ ॥

---

१ या व्यापकत्वाची कल्पना अथवा भावना प्रळयकाळच्या उदकाचे दृष्टांतानें श्रीज्ञानेश्वरांनीं आपल्या ज्ञानेश्वरीमध्यें अनेक ठिकाणीं उत्तम रीतीनें वर्णिली आहे.—( ओव्या ) " परि, तया भेटती ऐसें। जे ज्ञानें सर्वत्र सरिसे। महाप्रळयांबूचें जैसें। भरलें पण " ॥ " तैसा ,जिये वस्तूच्या ठायीं। कोण्हीच कां आभास नाहीं। तें माझें निजधाम पाहीं। पाटाचें गा ॥ " " कां कल्पांतीचिया पाणिया। काय वोत भरती धनंजया। ह्मणोनि कैंचे अंश अविक्रिया। एका मज ॥ " " पैं ग्रसूनि आपुली मर्यादा। एक करीत नदीनदां। उठी कल्पांतीं उदावादा। एकार्णवाचा " ॥ ( ज्ञा. अ. १९ ओं. २८४,३१६,३३७,९३३ ) तसेंच आणखी—" कल्पांतीं उदक उदकें। रुंधिलिया वाहों ठाके। तैसा आत्मेनि मियां येकें। कोंदला तो " ॥ " भांगारापरतें कांहीं। लेणें गुंजही भर नाहीं। हें आटूनियां ठायीं। कीजे जैसें " ॥ " उदका एका परतें। तरंग नाहींच हें निरुतें। जाणोनि तया आकाराःतें। न घेपे जेविं " ॥ " तंव्हां कल्पांताचिये वेळे। नदी सिंधूचे पेंडवळे। मोडूनि भरिले जळें। आब्रह्म जैसें " ॥ इ. ( अ. १८ ओं. ११६६,११८९,११९०,११०७ )

ऐसें प्रत्ययास आलें ना? आतां जरी अनेक नामरूपात्मक जग भासलें, तरी तें काय? तूंच कीं. ऐसें समजलें कीं? "मी जसा आहें तसाच सजातीय, विजातीय, व स्वगतभेदरहित, त्याचप्रमाणें बहिरंतरवर्जित आहे. तेव्हां माझे स्वरूपीं दुसरी विजातीय वस्तु नाहींच आणिक कोठून आली ह्मणावी हें काय ह्मणणें? माझे वेगळा दुसरा ठावच नाहीं. देशच नाहीं. देशकालाद्यैन व च्छिन्न अनंत, अपार, जेथें पहावें तेथें मीच मी आहें, तेव्हां आणिक कोठून आली हें ह्मणणेंच नाहीं. आतां हें "भासलें" ह्मणावें तर मला कांहीं सर्पासारखा कांचरा तर येतच नाहीं. मी निर्विकार, निरंजन, निरालंब, परिणामहीन, व सद्रूप आहें. तेव्हां कांहीं दुसरें-नामरूपात्मक पटल आलें, हें ही ह्मणणें नाहीं. तेव्हां सर्वथा (सर्व प्रकारें) अन्य विजातीयाची वार्ता नाहीं. जसा आहे तसाच निरंतर मीच परब्रह्म आहे," ऐसें तुज समजलें?

शिष्य.–होजी!

गुरु.–बारे, आतां जरी तुला, जें रूपनाम भासलें तरी, तें

---

याचप्रमाणें आचार्य आपल्या 'विवेक चूडामणि' ग्रंथांत ह्मणतात.–

**श्लो० कल्पार्णव इवात्यन्तपरिपूर्णैकवस्तुनि । निर्विकारे निराकारे निर्विशेषे भिदा कुतः ॥ ४०३ ॥** अर्थ–निर्विकार, निराकार, निर्विशेष व प्रलयकालच्या समुद्राप्रमाणे अत्यन्त परिपूर्ण अशा एका वस्तूच्या ठायीं भेद कोठून येणार?

२ "ब्रह्मनिर्मळ निश्चळ । शाश्वत अमळ विमळ । अवकाश घन पोकळ । गगना ऐसें" (दासबोध, द. १२ स. ६ ओं. १)

१ 'सजातीय' ह्म० एकाच जातीचें दुसरें, 'विजातीय' ह्म० भिन्न जातीचें, व 'स्वगत' ह्म० जातीपैकींच एक भाग. यास दृष्टांत–" वृक्षास वृक्षांतर (अन्य वृक्ष) हा सजातीय भेद, शिळादिक (पाषाण इ०) विजातीय, व पुष्पफळादिक हा स्वगत भेद होय. या प्रकारें आत्म्यास

कांहीं आतां विजातीय नाहीं. तें तें रूप, तें तें नाम सर्व तुझेंच, ऐसें समज. सर्व तूंच आहेसरे. केवळ जळ असतां तरंग बुद्बुद भासले, तरी ते विजाती आली नाहीं, झाली नाहीं, तें सर्व केवळ जळच आहे ऐसेंच. तंतू पट भासले, तरी पट विजातीय नाहीं. तो तंतूच आहे. एवं ( याप्रमाणें ) सोन्यांत नग भासले, तरी नग विजातीय नाहीं, सोनेंच आहे. मृत्तिकेंत घट भासला, तरी घट विजातीय नाहीं, मृत्तिकाच आहे. तैसें +उपादान तर तूंच आहेस. आतां जग भासूं दे खुशाल. जग विजातीय नाहीं; तें सर्व तूंच आहेस. जें जें नामरूप भासतें, तें तें आतां तूं. अमुक नाहीं ऐसें कशास ह्मणतोस? नाहीं म्हणायास तर दुसरा कांहीं पदार्थच नाहीं, कीं ज्यास तूं नाहीं ह्मणशील. तेव्हां, आतां सर्व मीच आहें ऐसेंच ह्मण. कां कीं, *सर्वाधिष्ठान सर्वकारण तर तूंच आहेस. आतां काय? दुसरी विजाति कांहीं होत नाहीं. आतां जें जें कांहीं तें तें सर्व तूंच परब्रह्म आहेस. बा रे, आतां भेदच नाहीं. भेदाभेदरहित सर्व तूंच आहेस.

---

सजातीय, विजातीय व स्वगत भेद नाहींत........देवतात्मा, यज्ञदत्तात्मा, चैत्रात्मा, मैत्रात्मा ह्मणून सजातीय विजातीय भेद,–तसेंच, पृथ्वी आप तेजादि करून सजातीय विजातीय भेद.... इच्छा, द्वेष, सुख, दुःख सत्व, रज, तम ह्मणून स्वगत भेद नाहीं." ( मननग्रंथ–लेखी )

( ओं. ) विजातीय भेद मी 'देह' ह्मणणें । सजातीय भेद मी 'जीवपणें' । स्वगत भेद मी 'ब्रह्मस्फुरणें' । हे तिन्ही नेणे परमात्मा ५२४

विशेष समजूतीकरितां परिशिष्ट पहावें.

( एकनाथी भागवत–अ. २८ )

२ बाह्याभ्यंतर भेद रहित.

**सर्वंखल्विदंब्रह्मेतिश्रुतेः** हें विशद करून सांगूं. पूर्वीच समजलें नामरूप विजाति दुसरी नाहींच असें? आतां जें नामरूप भासलें, तें आहेसें भासत. त्याचे ठायीं आहे पण कोणाचें? तुझेंच अस्तित्वें पदार्थ मात्र व्यापला आहे. आतां तुला नाहीं ह्मणायास ठावच नाहीं. नाहीं कशास ह्मणतोस तें सांग अमूक आहे ह्मणून. ज्यास आहे ह्मणतोस, त्या सर्वशब्दमात्रा ' अस्तित्व ' व्यापक आहे. तूं, नाहीं असें कोणत्या पदार्थास ह्मणतोस? अमूक एक पदार्थी अस्तित्व नाहीं. ऐसें नाहींसें तर कर वरें पाहूं.

**शिष्य**–विचारून ( विचार करून ) बोलतो " जी! पहिले शत ( शंभर ) होते, त्यांतून आतां एक नाहीं; येथें नाहीं ह्मणणें आलें. येथें ' नाहीं ' एशिया .शब्दीं ' नास्तित्व ' प्रसक्त झालें ऐसें वाटतें. "

**गुरु.**–बा रे, एक. नाहीं. ऐसा पदार्थच नाहीं.

**शिष्य**–बोले " शतांतून एक नाहीं हा. "

**गुरु** रुवाच ( गुरु ह्मणाले )–अरे, कोणता पदार्थ नाहीं?

**शि०**–अमुक नाहीं.

३ " अनंतत्व ह्मणजे देशेंकरून, कालेंकरून, वस्तूकरून परिच्छेद नाहीं ( छेदला–भिन्न केला जात नाहीं. ) आकाशासारिखा सर्व देशामध्यें आत्मा व्यापक आहे, ह्मणोन देशपरिच्छेद नाहीं; कालत्रयीं विद्यमान आहे, ह्मणून कालपरिच्छेद नाहीं; सर्व वस्तुरूप आहे, यास्तव वस्तुपरिच्छेद नाहीं; " ( ' ब्रह्मोपदेश ' नामक लेखी ग्रंथ. )

४ अज्ञानरहित, स्वयंप्रकाश. ५ अन्याधाररहित. ६ दुधाचें दहीं तूप इ० परिणाम होत, त्याप्रमाणें आत्म्याचे काहीं होत नाहींत. ह्म० दृश्यमान जगत् आत्म्याचा परिणाम नव्हे. ७ केवल अस्तित्वानें असणारा.

+ वस्तूचें अभिन्नरूप अ० मुख्यकारण. जसें–मृत्तिका घटाचें उपादान कारण आहे. ( विशेष समजून परिशिष्टांत पहावा. )

* सर्वांस मूळ आश्रय.

गुरु०–खराच नाहीं?

शि०–खराच नाहीं.

गु०–नाहीं त्यांत जें खरेंपण, तें काय? आत्म्याचें सत्यत्व तें सर्वत्र आहे. आतां स्पष्टखें दाखवूं. अमुक नाहीं त्यास तूं काय ह्मणतोस?

शिष्य.–नाहीं. ( ह्म० ' नाहीं ' असें ह्मणतों. )

गु०–' नाहीं ' या पदार्थाचा ( शब्दाचा ) अर्थ काय?

शि०–' नाहीं ' या पदार्थाचा अर्थ ' कांहीं नाहीं ' हाच.

गु०–अरे, नाहीं या ऐशा पदार्थांत कांहीं तरी अर्थ आहे, किंवा तें विनाअर्थाचें पद आहे?

शि०–जी! ' नाहीं ' ऐशा पदांत ' कांहीं नाहीं ' हा अर्थ आहे.

गु०–हो अर्थ आहे कीं?

शि०–हो. जी!

गु०–एकून पदार्थ ( पद+अर्थ=पदार्थ ) आहे, हें त्वांच तर सिद्ध केलें. तूं नाहीं कशास ह्मणत होतास? नाहीं तेंच आहे, ऐसें नास्तित्वांतही अस्तित्व त्वांच तर सिद्ध केलें कीं!

शिष्य बोले–ही कैसी देखत भुली! हें तर फिरून आहेच असें सिद्ध झालें.

गु०–अरे, अस्तित्व कैसें नाहींसें होईल? तुला तें समजलें नव्हतें इतकेंच, अरे तें शब्दापूर्वींच आहे. अधिष्ठान अर्थच पूर्वीं नसता, तर नुसता शब्द काय सांगता? काय घेऊन उठता ( उठला असता )? तेव्हां शब्दापूर्वीं कांहीं अर्थ अधिष्ठान आहे. त्यावरतें ( त्यावर ) नाहीं आहे इत्यादि शब्द उमठतात; आत्मप्रकाशेंकरूनच प्रकाशित होतात. तो त्या शब्दाचा अर्थ ऐसें कोण ह्मणेल? तो, स्वतःसिद्ध शब्दापूर्वींच आहे. ' नाहीं ' या शब्दांतही समान

पूर्ण आहे, व ' आहे ' या शब्दांतही समान पूर्ण आहे. तो ' नाहीं ' आहे ' या दोंही शब्दांस आतळत नाहीं. उभय शब्दातीत आहे. आतां तुला नाहीं ह्मणायास जागाच नाहीं. आहे तें सर्व तूंच—परब्रह्म आहेस. तेंच श्रुति बोलली ' सर्वं खल्विदंब्रह्मेति '. कां कीं, अनादि अधिष्ठान, परब्रह्मच आहे ऐसें समजलें. ( ह्म० परब्रह्मावांचून अन्य अधिष्ठान कालत्रयीं नाहीं ) आतां कांहीं कां भासेना सर्व ब्रह्मच आहे. विजातीचा लेशच नाहीं. सर्व परब्रह्मच परब्रह्म आहेस. ऐसें समजलें कीं ?

शि०—हो जी !

गु०—तेंच सप्रमाण सांगूं—

**तंतुमात्रो भवेदेव पटो यावद्विचारितः । आत्मतन्मात्रमेवेदं तद्वद्विश्वं विचारितम् ७२ यथा न तोयतो भिन्नः फेनोर्मिहिमबुद्बुदाः । आत्मनो न तथा भिन्नं विश्वमात्मविनिर्गतम् ७३ चिदाकार मिदं सर्वं जगदित्येव भावयन् । यस्तिष्ठत्युपशान्तिस्थः सब्रह्मकवचः सुखी ७४ समस्तं खल्विदं ब्रह्म सर्व मात्मैवमाततम् । अहमन्य इदं चान्यदित्यखण्डं न खण्डय ७५ ब्रह्मचिद्ब्रह्मभुवनं ब्रह्मभूतपरंपरा । ब्रह्माहं ब्रह्म मच्छत्रुब्रह्मसन्मित्रबांधवाः ७६ चिदिहास्तीहचिन्मात्रमिदंचिन्मात्रमेवच । चित्त्वं**

---

१ ( ओंव्या ) जो जो दृश्य पदार्थ देखिजे । श्रवणीं जो जो ऐकिजे । तेथें तेथें ' अस्तित्वें ' सोस घेइजे । वस्तु जाणिजे ' आहेपणें ' ॥ जे जे ' सत्तारूप ' तेचि ' वस्तु ' पाहे । तेथें ' अस्तित्वें ' ब्रह्मचि आहे । जेथें नाहीं ह्मणो जाय । तेथेंही आहे सर्वाभावें ॥ सर्वाचें जें अभावरूप । सर्व निरासें उरे निष्कंप । तेंचि तें ब्रह्मस्वरूप । अति अमूप उदारपणें ॥ अस्ति नास्ति या पक्षद्वयीं । मध्यें भासे जें कीं अक्षयी । नित्य व्यापक जें कीं सर्वही । जाण अनपायीं तेंचि ब्रह्म ( रं. यो. वा. प्र. १० वें; ओं. ३९२-९३-९४-९९-. )

चिदहमेवेति लोकश्चिदिति संग्रहः ( सिद्धान्तः ) ७७ यदस्ति यद्भाति तदात्मरूपं यन्नान्यतो भाति न चान्यदस्ति । स्वभावसंवित्प्रतिभाति केवला ग्राह्यं गृहीतेति मृषा विकल्पः ७८ नैकमण्यंगदाद्यैश्च यथैकं हेम संस्थितम् । उपाधिभिरनेकोपि तथात्मैकः स्वरूपतः ७९ शरारावघवा यद्वद्विकाराश्च यथा मृदः । अद्वैतं द्वैतवद्भाति तथा स्थावर जंगमम् ८० चिदेव पंचभूतानि चिदेव भुवनत्रयं। चिज्ज्ञातमधुना सम्यगहमेव चिदेव हि ८१ उपादानं प्रपंचस्य ब्रह्मणोऽन्यन्नविद्यते । तस्मात्सर्वः प्रपंचोऽयं ब्रह्मैवास्ति न चेतरत् ८२ श्रुत्या निवारितं नूनं नानात्वं स्वमुखेन वै । कथं भागो भवेदन्यः स्थिते चाद्वयकारणे ८३ ब्रह्मणः सर्वभूतानि जायन्ते परमात्मनः । तस्मादेतानि ब्रह्मैव भवन्तीत्यवधारय ८४ ब्रह्मैव सर्वनामानि रूपाणि विविधानि च कर्माण्यपि समग्राणि बिभर्तीति श्रुतिर्जगौ ८५ सुवर्णाज्जायमानस्य सुवर्णत्वं च शाश्वतम् । ब्रह्मणो जायमानस्य सुब्रह्मत्वं च शाश्वतम् ८६ घटनाम्ना यथा पृथ्वी पटनाम्नाहि तंतवः । जगन्नाम्ना चिदाभाति ज्ञेयं तत्तदभावतः ८७ सर्वोऽपि व्यवहारस्तु ब्रह्मणा क्रियते जनैः । अज्ञानान्नविजानन्ति मृदेव हि घटादिकम् ८८ कुंभो यथा मृन्मयश्च तथा देहोऽपि चिन्मयः । आत्मानात्मविवेकोऽयं मृषैव क्रियतेऽबुधैः ८९ व्याप्य व्यापकता मिथ्या सर्व मात्मेतिशासनात् । इति ज्ञाते परे तत्त्वे भेदस्यावसरः कुतः ९० ज्ञानं न भवतो भिन्नं ज्ञेयं ज्ञानात्पृथक् नहि । अतो न त्वितरं किंचित्तस्माद्भेदो न विद्यते ९१

**अर्थ.**—ज्याप्रमाणें, पटाचा विचार केला असतां तो केवळ तंतुरूप आहे. त्याप्रमाणें, जगताचा विचार केला असतां तें केवळ आत्मस्वरूपच आहे. ॥ ७२ ॥ फेंस, लाट, हिम (बर्फ,) व बोंबाडा.हे पाण्याहून भिन्न नाहींत, तद्वत् आत्म्यापासून निघालेलें-उत्पन्न झालेलें ( आत्मसत्तेवर भासणारें ) जगत् आत्म्याहून भिन्न नाहीं. ७३. हें सर्व जगत् ' चिद्रूप ' आहे अशी भावना करून, जो शान्ति धरून राहतो, तोच ब्रह्मकवची अर्थात् द्वैत-भयविरहित होत्साता सुखी होतो. ७४ (श्लोक ७५ ची टीका खालील *टीपेंत पहावी. )—तूं अखण्ड वस्तूचा खंड करूं नको. चित्स्वरूप ब्रह्म, स्वर्गादि भुवनें ब्रह्म, भूतपरंपरा ब्रह्म, आपण ब्रह्म, आपले शत्रु ब्रह्म व आपले मित्र बांधवादिकही ब्रह्मच ऐसें समज. ७६ इहपरत्र चैतन्य भरलें आहे; इतकेंच नव्हे तर इहपरत्रादि नसून सर्व चैतन्यच कोंदलें आहे; हें सर्व दृश्य जगत् चिन्मात्र म्ह० चैतन्यच आहे; तूं चैतन्य; मीही चैतन्यच; व हे सर्व ०लोकही चैतन्यच आहेत; हा सिद्धान्त होय. ७७ जें म्हणून आहे, जें जें म्हणून भासतें, तें आत्मरूप होय. अन्य म्ह० दृश्यादिक भासतें तेंही अन्य नव्हे. स्वभावें करून असणारी संवित् म्ह० ज्ञानकला हीच सर्वत्र स्फुरद्रूप होते; याकरितां ग्राह्य व ग्रहणकर्ता—ज्ञेय ज्ञाता-दृश्य. द्रष्टा-इत्यादि विकल्प खोटे आहेत. ७८. अनेक अलंकारांनीं जसें एक +सुवर्ण, तसा

---

*श्लो० ७५ ची टीका—( ओंव्या ) समस्त जितुकें विश्वजात । तितुकें एकचि स्फुरत । ब्रह्मेवीण अणुमात्र किंचित । नाहीं निश्चित जाण हरी ॥ हें आकार मात्र जें समस्त । आत्मा एकचि जाण सतत । सर्वत्र एकला एक व्याप्त । सर्वीं सर्वगत अनन्यपणें ॥ ऐसें जें अखंड दंडायमान । पूर्णानंदैक पूर्णघन । तयातें खंडिती अज्ञानपण । आपणा अन्य मानूनियां ॥ मी अन्य तो मजहूनि अन्य । तोही तेणेंसी असे भिन्न । ऐसें अज्ञानी करिती खंडण । अहं अन्य म्हणोनियां ॥ जग तें मजहूनियां वेगळें । मी तो जगाहूनियां निराळें । ऐसें अखंडासी अज्ञानबळें । खंडिती सगळे एक वस्तु ॥ ( रं० योगवाशिष्ठ ओं० ६१४-१८ )

० ( ओं० ) गोडी तेचि साखर चोख । तेंवि चिदात्मा तेचि हे लोक । जगासी मज वेगळिक । अणुमात्र देख असेना पैं ॥ ३९७ ॥—( एकनाथकृत च० भा० टीका. )

अनेक उपाधींनीं एक आत्माच नटला आहे. ७९. शरीर एक पण. अवयव निरनिराळे भासतात, किंवा एका मृत्तिकेचे विकार नानात्वरूपानें जसे भासतात, तसें हें ×स्थावर जंगम अद्वैत असतां, द्वैतवत् भासतें ८०. पंच-भूतें हीं चिद्रूप ( केवळ चैतन्यच ) आहेत, त्रिभुवनें हीं चैतन्यच आहेत. असें जें चैतन्य तें आतां यथायोग्य कळून आलें. हें घरही चैतन्यच आहे. ८१. प्रपंचाचें उपादान जर ब्रह्मावांचून कांहींच नाहीं, तर हा सर्व प्रपंच ब्रह्मच आहे; इतर कांहीं नाहीं. ८२. श्रुतीनें तर आपल्या मुखानें ‘ नानात्व ’ ( ह्म० भेद, निरनिराळेपणा ) नाहींसें करून दाखविलें आहे. मग, मूळ कारण असें ‘ अद्वय ’ असतां, भेद कसा घडेल? ८३. परब्रह्म परमात्म्यापासूनच सर्व भूतें उत्पन्न होतात; याकरितां तींही ब्रह्मच होत ऐसें समज. ८४. ( श्लो० ८५ टीका खालील टीपेंत पहावी. ) सुवर्णा-पासून उत्पन्न होणारें जसें सर्वकाळ सुवर्णच आहे, तसें ब्रह्मापासून उत्पन्न

\+ जेंवि सुवर्णाचें केलें लेणें । परि सोनें वेगळें होऊं नेणे । तेंवि माझेनि पूर्णपणें । जगाचें नांदणें मद्रूपेंचि पैं ३५६ ( ए. च. भा. टी. ) योगवाशिष्ट

× ( ओंव्या ) अगा एकचि हें शरीर पाहीं । नाना अवयवाकार भासे सर्व ही । परि एका सारिखा एक नाहीं । नामें तयांहीं तदनुसार १७४ नेत्र श्रोत्र आणि नासिक । हस्त चरण अंगुल्यादिक । अनेक आकार आणि नामें देख । परि होय सकळिक देह चियेक ७५ घट शरावादि अनेक पात्रें । घडले रांजणादि विचित्रें । ते मृतिकेवीण स्वतंत्रें । बहुतां प्रकारें येकचि भासे ७७ तैसें हें स्थावर जंगमादिक । विश्व अद्वैतीं भासे अनेक । तें अद्वैत न मानूनियां लोक । साचचि अनेक मानिती ७८ अद्वैताचि द्वैतासा-रिखें । भासे तैसेंचि अज्ञानी देखे । तेणेंचि भोगी जन्म दुःखें । पशुवेषें असे वर्तत ७९ अगा श्वान शूकरादि पशुयाती भिन्न परस्परें सृष्टि देखती । तैसीच जाण त्याची ही गती । तरी नराकृती धिक् त्याची ८० नराकृति ह्मणवणें । आणि पशुज्ञानें करूनि वर्तणें । धिक् जिणें तें लाजीरवाणें । परा-वृत्ती मनें न धरिती १८१ ( रं. यो० वा० प्र० ८ )

ꣻ ( प्रा०, अनु० श्लो० ) सर्व नामें, सर्व रूपें । विविधें, विविधा क्रिया । ब्रह्म तें धरितें, तेंचि । सर्व ब्रह्म वदे श्रुति ॥ ( अपरोक्षानुभूतीवरील वा पं० कृत समश्लोकी )

होणारें सर्वकाळ शाश्वत ब्रह्मरूपच आहे. ८६. ( श्लो० ८७ टीका खालील टीपेंत पहावी. ) जनांकडून सर्व व्यवहार ब्रह्मद्वाराच घडतो, परंतु अज्ञानामुळें, घटादिक मृत्तिकाच आहे, असें त्यांस समजत नाहीं. ८८. घट जसा मृन्मय ह्म० मृत्तिकारूप आहे, तसा देहही चिन्मय ह्म० चिद्रूप आहे. आत्मानात्मविवेक ( जड चैतन्य विचार ) करणें हें उगीच आहे.—सर्व चराचर विश्व आत्मरूप झाल्यानंतर देह ह्मणून निराळा जडरूपानें कसा व कोठें असणार? ८९. सर्व कांहीं आत्मरूप आहे अशा बोधामुळें व्याप्य व्यापकता ही मिथ्या ठरते किंवा ठरली. असें परमात्मतत्त्व जाणल्यानंतर भेदास अवकाश ह्म० स्थळ कोठूंचें बरें? ९०. तुझ्याहून ज्ञान भिन्न नाहीं व ज्ञानाहून ज्ञेय भिन्न नाहीं. ह्मणून इतर-दृश्य ही तुझ्याहून भिन्न नाहीं. याकरितां भेद ह्मणून मुळींच नाहीं. ९१.

अरे, ऐसें असतां तूं नाहीं काय ह्मणतोस? आहे तेंही आहे, नाहीं तेंही आहे. तेव्हां जें परब्रह्म आहे तेंच आहे. तेव्हां, **यद्यदस्ति तथा भाति यद्यन्नास्ति तथापि च । तत्त ब्रह्मधिया नित्यमुपास्यं ब्रह्मवित्तमैः ॥ ९२ ॥** [ अर्थ—जें जें ह्मणुन आहे, जें जें ह्मणून भासतें, त्याचप्रमाणें जें जें नाहीं असें वाटतें तें तें सर्व ब्रह्मबुद्धीनें ( ब्रह्मच अशा भावनेनें ) श्रेष्ठ ब्रह्मज्ञात्यांनीं उपासावें दृढ श्रद्धेनें पहावें. ] आतां तर समजलें, नाहीं ह्मणायाला दुसरें कांहीं नाहीं असें!

शि०—हो. जी!

गु०—अनेक प्रकारें दाखविलें भेद नाहीं ऐसें. वस्तु अभेद ऐसें समजलें?

शि०—हो.

---

१ ( प्रा० अ० श्लो० ) घटनामें जशी पृथ्वी, पटनामेंचि तंतुही । जगनामें तसा आत्मा, असे आत्मा नसे जग ॥ ( अ० भू० वा० पं० समश्लोकी—६४ )

२ ( अभंग ) जड शोधोनियां चैतन्य काढिलें । जड काय झालें सांग मज ।१।
पटांतील तंतू वेगळे काढिले । पट काय झाला सांग मज २
गारेंतील पाणी वेगळें काढिलें । गार काय झाली सांग मज ३
तुका ह्मणे ब्रह्म वेगळें काढिलें । विश्व काय झालें सांग मज ४

**गु०—अरे, भेद नाहीं, विजाति नाहीं, ऐसें तुज समजावें, विजाति मावळावी, भेददृष्टि जावी, ह्मणून मी** तुला **हा परिणामालंकार दाखविला. वस्तुतः हा परिणामालंकार येथें साजत नाहीं. वस्तु अभेदही नाहीं.** कारण **कोणाशींही भेद नाहीं, त्यास अभेद** तरी **काय ह्मणणें? जसा घटाचा परिणाम मृत्तिकेंत, व पटाचा तंतूंत;** तसच जसा **घट व मृत्तिकचा** किंवा **पट व तंतूचा अभेद, तैसा—** विश्वाचा व ब्रह्माचा अभेद ह्मणावयाला. **येथें कांहीं ब्रह्माचें विश्व ' घडलें *नाहीं.' ह्मणून त्याचा परिणाम आत्म्यांत** ह्म० ब्रह्मांत **होईल, हें ह्मणणेंच नाहीं. मद्धटादि ' ग्राह्य ' ह्मणोन परिणाम विपरिणाम संभवतात,** व ह्मणनच त्यांचा परस्परांशीं **अभेदही ह्मणतां,**

---

१. ( ओं० ) तेथं भेद ना अभेद । बोलतें ना निःशब्द । शाहणें ना मुग्ध । देखणें ना अंध चिद्रुपपणें ४८६ रात्री नाहीं सूर्यासी । मा दिवसु काय आहे त्यासी । तेंवि ज्ञान आत्म्यासी । कदा काळेंसी स्पर्शेना ५०८

( एकनाथी भागवत अ० २८ )

* ( ओं० ) प्रपंच एक झाला होता । ईश्वररूपीं, मिथ्यावार्ता । पुढें होईल मागुता । हेंही सर्वथा असेना ६१५

( एकनाथ—च० भा० टीका, )

गरीब आहेत ह्मणून श्रीमंतांस श्रीमंत ह्मणतात, रात्र आहे ह्मणून दिवसास दिवस ह्मणतात, गरीब नसते तर श्रीमंतास श्रीमंत व रात्र नसती तर दिवसास दिवस कोणी ह्मटलें असतें? हे परस्पर विरुद्ध शब्द परस्पर साक्षेप आहेत. तसेंच अज्ञान साक्षेप ज्ञान आहे. आत्म्याचे ठिकाणीं अज्ञानच नाहीं, अर्थात् तत्सापेक्ष ज्ञानही नाहीं. तो भेदाभेदातीत आहे, ज्ञानाज्ञानातीत आहे, असेंच ह्मटलें पाहिजे.

२ ( ओं० ) ग्राह्य जे कीं घटपट पदार्थ । जे जे आपणासी दृश्यत्वें भासत । तद्रुप होऊं नको अकस्मात । आपणाव्यतिरिक्त ह्मणोनियां २९२ देहादि दृश्याकार न व्हावें ताता । ग्राहक अहंकारविशिष्ट प्रमाता ( जीव ) तद्रुपहि न होऊनियां तत्वतां । सांडी कथा ग्राह्य ग्राहकाची २९३ ( रं० योगवाशिष्टसार प्र० ६ वें )

येईल. तथापि, अरे, जो ग्राह्यग्राहकनिर्मुक्त, परिणामादिवर्जित, त्याचे ठायीं भेदाभेद व परिणामालंकारही घटत नाहीं.

शि०—तर काय हें ?

गु०—विवर्तालंकारें समज. तेंच सांगें—

‘ न जायते न म्रियते कश्चित्किंचित्कदाच न । जगद्विवर्तरूपेण केवलं ब्रह्म जृंभते ॥ ९३ ॥ कश्चित्किंचित् नोत्पद्यते, न च नश्यति, किंतु ब्रह्मैव जगद्विवर्तरूपेण प्रकाशते. यथा कालत्रयेऽपि रज्जौ सर्पादिकं नास्ति, तथाऽपि रज्जौ सर्पो भासते. अन्यथा भावलक्षणो ‘ विवर्तः ’ यथा शुक्तौ भ्रमवशात् रजताद्याभासः स्वरूपापरित्यागेन पररूपापत्तिर्विवर्तः नश्यतिच. भ्रमवशात्तथा संसारोऽपि विवर्तवदेव, स्वरूपस्यैव मुख्यत्वात् ज्ञाने सति भ्रम एव गतः न संसार इत्यर्थः वंध्यापुत्रो गत इति वक्तुमशक्यत्वात् ’ ॥ ९४ ॥

[ अर्थ—किंचितही, कांहींच केव्हांही उत्पन्न होत नाहीं अथवा नाश पावत नाहीं. ‘ जग ’ अशा विवर्तरूपानें ब्रह्मच शोभतें—प्रकाशतें. ९३. जसें, रज्जूच्या ठिकाणीं सर्पादिक त्रिकाळींही नाहीं, तथापि त्यांत ( रज्जूंत ) सर्प भासतो; एका वस्तूवर दुसऱ्या वस्तूचा भास होणें याला ‘ विवर्त ’ असें ह्मणतात, अथवा, वस्तूच्या मूळ स्वरूपाचा त्याग न होतां, तिजवर दुसऱ्या वस्तूचा आभास होणें यास ‘ विवर्त ’ ह्मणतात—शुक्तीच्या ठिकाणीं ( शुक्ति ह्म० मोत्यांचा अथवा माशांचा शिंपला. हे शिंपले आंतल्या बाजूनें रुप्यासारखे पांढरे व चकचकित असतात. ) शुक्तिपणाचा लोप न होतां भ्रमानें रजताचा ह्म० रुप्याचा भास होतो, यालाच ‘ विवर्त ’ ह्मणतात; हा विवर्त भ्रमानें उत्पन्न होत असल्यामुळें, भ्रम, नाहींसा होतांच तोही नाहींसा होतो; तसें, आत्मस्वरूपाचें उत्तमप्रकारें ज्ञान झालें ह्मणजे भ्रमाचा नाश होतो. मग, संसार मुळींच नाहीं, असें तात्पर्य. वांझेचा पुत्र

गेला असें ह्मणणें देखील योग्य नाहीं. कारण वांझेला पुत्रच नाहीं, तर त्याचें जाणें कोठलें ? ] **यथैव व्योम्नि *नीलत्वं यथा नीरं मरुस्थले । पुरुषत्वं यथा स्थाणौ तद्वद्विश्वं चिदात्मनि ९५ यथैव शून्य वेतालो गंधर्वाणां पुरं यथा । यथाकाशे द्विचन्द्रत्वं तद्वच्चिति जगत्स्थितिः ९६** [ अर्थ–ज्याप्रमाणें आंकाशाचे ठिकाणीं-ती केवळ पोकळी असतां–नीलत्वाचा ( निळ्या रंगाचा ) भ्रम, मारवाडदेशांत मृगजलाचा भ्रम, अथवा स्थाणु ह्म० खांबाचे ठिकाणीं पुरुषत्वाचा ( ह्म० अंधारांत खांबाचे ठायीं कोणी मनुष्यच उभा आहेसा दिसणें, हा ) भ्रम होतो, तद्वत चिदात्म्यामध्यें विश्वाचा भ्रम होतो, वस्तुतः विश्व नाहींच. ९९. बागुलबावा अथवा गंधर्वनगर ह्मणजे–जसें कांहींच नाहीं, किंवा आकाशाचे ठिकाणीं दोन चंद्राचा भास जसा मिथ्या आहे, त्याप्रमाणें **चिति** ह्म० शुद्ध चैतन्यामध्यें जगताची स्थिति मिथ्या आहे.–जग हें मुळींच नाहीं. ९६ ] **यदन्यदन्यत्र विभाव्यते भ्रमादध्यासमित्याहुर मुं विपश्चितः । असर्पभूते हि विभावनं यथा रज्ज्वादिके तद्वदपीश्वरे जगत् ॥ ९७ ॥** [ अर्थ–भ्रमानें एका वस्तूवर दुसऱ्या वस्तूचा भास होणें यालाच विद्वान लोक ' अध्यास ' असें ह्मणतात. जसें, कधींही सर्पपणा नाहीं अशा रज्जूच्या ठिकाणीं त्याचा ह्म० सर्पाचा भास होणें. तसेंच ईश्वराचे ठिकाणीं जगत् हा मिथ्या भास आहे. ] अरे, एवंविधी ( या प्रमाणें ) **एव वन्ध्यासुतो याति शशशृंगधनुर्धरः । मृगतृष्णाम्भसि स्नातः खपुष्प धृतशेखरः ९८ मायया कल्पितं विश्वं परमात्मनि केवले । रज्जौ भुजङ्गवद्भ्रान्त्या विचारे नास्ति किंचनेति ॥ ९९ ॥**

---

* ( ओं० ) नाना गगनीं जैसी नीळिमा । तेणें नीळत्वाचि गमे व्योमा । तो भासमान गा सुरोत्तमा । नभगरिमा जैसी तैसी ॥ ( रं० योगवाशिष्ट–प्र० ८ ओं० ३१७ )

[ अर्थ—हा वांझेचा मुलगा, हातांत सशाच्या शिंगाचें धनुष्य घेऊन, मृगजला-मध्यें स्नान करून, डोक्यावर आकाश पुष्प धारण करून जात आहे, या ह्मणण्याप्रमाणेंच, अथवा रज्जूच्या ठिकाणीं भ्रांतीच्या योगानें जशी सर्पाची कल्पना, त्याप्रमाणें केवळ परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं मायेच्या योगानें जगताची ही वृथा ' कल्पना ' आहे. ]

अरे आतां अलंकारेंकरून पररूपानुत्पत्तीचा आत्यंतिक अभाव समजला. आतां अभेद कोणाशीं नाहीं, त्यासी अभेद म्हणणेंच नाहीं. या नांव भेदाभेदातीत. आतां, विवर्त भासतो तो भासही. नाहीं हें रूपालंकारें सांगूं. विवर्तभानास कारण मन. मनाच्यायोगें विवर्त भासतो. तेंच सांगूं—चित्तं कारणमर्थानां तस्मिन्साति जगत्रयम् । तस्मिन् क्षीणे जगत् क्षीणं तच्चिकित्स्यं प्रय-त्नत इति १०० [ अर्थ—सर्व विषयाचें अथवा दृश्यमानाचें मूळ कारण ' चित्त ' ( मन ) होय. त्या मनाचा नाश झाला असतां, त्यापासून उत्पन्न झालेल्या जगताचा—जगद्भानाचा-ही नाश होतो. याकरितां मनाची चिकित्सा

---

१ ( ओं० ) वांझेच्या सुने पुत्र झाला । तेथें भीष्मस्त्रियें पान्हा आला । तेणें पयपानें तो मातला । घरभंगू केला दिगंबराचा ३६ वंध्या पुत्राचा जन्मकाळ । रायें आणविला तात्काळ । राशी नक्षत्र जाति कुळ । सांगों जातां विकळ योग्यता होय ३३ मृगजळाची पोहे बरवी । गंधर्व नगरीं घालावी । वारा वळूनी सूत्र स्वभावीं । वाती लावावी खद्योत तेजें ३४ गुंजेचे निजतेजें दिवी । हनुमंत लग्नीं लावावी । या सोहळियालागि विकावी । वोसगांवीं निजच्छाया ३८ आकाशाचीं सुमनें । सुवास कीं वासहीनें । विवंचिती जें देखणें । तें मायेचें सांगणें सांगोत मुखें ३९ एवं मायेचें जें बोलणें । तें सांगतांचि लाजिरवाणें । नुपजत्याचें श्राद्ध करणें । तैसी सांगणें महामाया ४० (—एकनाथी भागवत अ० २ रा. )

करून मनोनाशाबद्दल प्रयत्न केला पाहिजे. ] जसें, वंध्यापुत्रच नाहीं, तेव्हां वंध्यापुत्रकृत आरामादि ( बाग बगीचा ) ही नाहीं हें समजतें; तसें, मनच नाहीं ऐसें समजलें, ह्मणजे मग मनोयोगें करून जें भासलें तो भासच नाहीं, ऐसें समजेल कीं?

शि०—हो जी!

गु०—तें मनच नाहीं, ऐसेंच दाखवूं.—**एषस्वभावाभिमतं स्वतःसंकल्प्य धावति। चेतना स्वयमम्लाना सैवेह मन आत्मनः १०१ असम्यग्दर्शनं यत्स्यादनात्मन्यात्मभावनं। यदवस्तुनि वस्तुत्व तन्मनो विद्धि राघव १०२** [ अर्थ—आत्म्याला स्वभावाभिमत—अज्ञानें करून रमणीय भासणाऱ्या पदार्थांची ग्राह्यबुद्धीनें इच्छा करून जें त्यांच्या मागें धांवतें, तें मन. चेतना ( आत्मा ) स्वतः अम्लान ह्म० जशाच्या तशी असते. पण पदार्थाचा संकल्प करून धांवतें, तें मन जाणावें १०१. वस्तूचें अयथार्थ ज्ञान ह्म० वस्तूचें सत्यस्वरूप न ओळखणें, देहेंद्रियादि अनात्मवस्तूच्या ठिकाणीं आत्मभावना करणें व शुक्ति-रजत, रज्जुसर्प, मृगजळ इत्यादि अवस्तूच्या ठिकाणीं वस्तुभावना

---

१. ( ओंव्या ) अगा मनोदयें उदय जगासी। ह्मणोनो जगाचें कर्तृत्व मनासीं। आपुलेनि संकल्पें प्रपंचासी। निश्चयेंसी करीतसे १२३ मनेंचि पदार्थजात स्फुरती। मनोलयें लया पावती। मनोनाशें सर्व शांती। मनेंचि उत्पत्ति सर्वांची १९१ यालागीं मनाची चिकित्सा। करावी गा त्रैलोक्याधीशा। जैसी रोगाची निर्विशेषा। कीजे चिकित्सा जयापरी १९२ विचार औषधें करूनि। चित्त आमय निर्दळूनि। अति साहस करूनी। भवसेनि चिकित्सिजे १९३ ( रं० यो० वा-प्र० ३ ) याचप्रमाणें आचार्यांनींही आपल्या विवेकचूडामणी ग्रंथांत सांगितलें आहे.—श्लोक—चित्तमूलो विकल्पोऽयं चित्ताभावे न कश्चन। अतश्चित्तं समाधेहि प्रत्यग्रूपे परात्मनि ॥ ४०९ ॥ अर्थ—या संसाररूप विकल्पाचें मूळ चित्त आहे. चित्त नसेल तर विकल्पही नाहींच. या साठीं प्रत्यग्रूप परमात्म्याचें ठिकाणीं चित्ताचा लय कर.

करणें याचें नांव मन. १०२. ] अनात्मत्वीं आत्मभावना, कांहीं नसतां कांहीं कल्पावें, ऐसियास मन बोलिजे. अरे, हेंच मन—अयं सोऽह-मिदं तन्मे एतावन्मात्रकं मनः । तद्भावनमात्रेण विचारेण विलीयते १०३ तत्सर्वं स्वैरमेवाशु संकल्पयतिचानिशं । तेनेयमिंद्रजालश्रीर्जागति प्रवितन्यते १०४. हा, तो, मी, हें माझें इत्यादि अनेक संकल्पात्मक मन. याच संकल्पें करून ही इंद्रजालश्री ( जगद्रूप गारूडाची शोभा ) भासते. या मनाची चिकित्सा केली पाहिजे, कीं हें काय आहे ऐसें? आहे किंवा नाहीं, ऐसें शोधून तर पहा बरें. पाहिलें असतां तें नाहींच ऐसें प्रत्ययास येईल. तरी कैसें तें सांगूं—मनोऽमुनैवाभ्युदितं स्वल्पमप्यनवेक्षणात् । स्वप्ने स्वमरणाकारं वीक्ष्यमाणं न विद्यते १०५ टी.—अमुना संकल्पेनैवाभ्युदितं मनः, मनागपि अनवेक्षणात्, अचिरादुदितं स्वस्यैव स्वप्ने मरणाकारं स्वप्नमरणं यथा, एवं मनोपि प्रेक्ष्यमाणं नास्ति, यथा स्वप्नमरणम्. [ अर्थ—स्वस्वरूपाची विस्मृती हेंच देहामध्यें ‘ मन ’ ऐसा भाव उत्पन्न होण्याचें कारण. आपल्या स्वप्नामध्यें भ्रमानें आपलेंच मरण अथवा दहनही एखादें वेळीं आपण पाहतों. परंतु जागे झाल्यानंतर जसें कांहींच नाहीं, तसें विचार करून पाहिलें असतां मन हें कांहींच नसून सर्व आत्माच आहे असें प्रत्ययास येतें. इत्यादि. ] संकल्पात्मक मन स्वैर व्यवहार करतें,

---

२. ( ओंव्या ) हा एक तो एक ह्मणत । मी एक आणि मज हें दिसत । ऐसें एकाचि चतुर्धा विभागत । मन निश्चित एतावन्मात्र १०० इत्यादि भेदातें रचितें । सर्वदा भेदातेंचि देखतें । भेददर्शनें नानात्व जल्पतें । जाणा निश्चित तेंचि मन १ इत्यादिकांचें जें अभावन । कारितांचि विचारें करून । लय पावे सर्वथा मन । नाहींच जाण ऐसें होय २ केवळ अविचारेंचि जयाची स्थिति । विचारें जातसे भस्मांतीं । तेंचि मन गा त्रिदशाधिपति । नाहीं व्यक्ती स्वतंत्र ३ ( रं० यो० वा० प्र० २ रें )

जंवर जाणत्यानें नीट विचारून ( विचार करून ) पाहिलें नाहीं तंवर. साक्षिखें पाहिलें असतां ती कल्पना कांहींच नाहीं. ( साक्षित्वें पाहणें, ह्मणजे-ती कल्पना कोणास उठली अथवा उठते हें पाहणें. कल्पना ही माझ्यावर—माझ्या ज्ञानावर उठली, कल्पनेस मी पाहतों अथवा कल्पना मला दिसते—कल्पनेला मी जाणणारा—पाहणारा निराळा आहे असा प्रत्यय घेत जाणें, याला साक्षित्वें पाहणें ह्मणतात. 'साक्षी' ह्मणजे तंट्यांत न पडतां—तंटा तादात्म्य न पावतां, तोटा अ० तें कर्म आपण अगदीं निराळा राहून पाहता तो. किंवा 'साक्षी' ह्म० फक्त पाहणारा. द्रष्टा हा दृश्याचा साक्षी आहे, दृश्य नव्हे. अर्थात् दृश्य निराळें व द्रष्टा निराळा. त्या प्रमाणें देहेंद्रियादि सर्व प्रपंच—जगत् हें दृश्य, व त्यास जाणणारें ज्ञान—आत्मा—आपण द्रष्टा. हा त्याहून अगदीं निराळा. कल्पना ह्या याजवर—याचे ज्ञानावर उठतात, त्या ह्याला दिसतात. याकरितां कल्पनारूप तो नव्हे; कल्पनेहून तो ( ह्म० आत्मा—आपण ) निराळा आहे. असें आपणास साक्षित्वानें पाहत गेलें ह्मणजे कल्पना आपोआप नाहींशा होतात. ) आपणच आहे केवळ. जैसी वाघाची आरोळी. ती दुसरी आरोळी ऐसें ह्मणावें तर ( वाघ निराळा व त्याची आरोळी निराळी असें ह्मणावें तर ) भिन्नत्वें आरोळी कांहीं रूप आहे ऐसें नाहीं. ती केवळ वाघच आहे. वाघ न ओरडला, तर आरोळी कुठें? आरोळी नाहींच; बाघच आहे. तैसें तूं पाहिलें? मन तंव ती कल्पना बरें! कल्पना कांहीं पदार्थ असावा, तेंही नाहीं. कां, तुला समजलें कीं?

शि०—आहे तो तर मीच आहें. विशुद्धज्ञानस्वरूप[1] तो मी निर्विकल्प आहें. आतां दुसरें तर कांहींच नाहीं. आहे तो मीच आहें. आतां ऐका,-मन कांहींच नाहीं; आतां मी जर विचारून पाहीन ( कोणताहि विचार अ० कल्पना करीन ) तर तेंचि मन ऐसें ह्मणण्यांत येईल. मी कांहीं चिंतीन तर तेंच चित्त ह्मणण्यांत येईल.

---

१. ज्ञान, दोन प्रकारचें.—( १ ) अंतःकरणवृत्तीचें—अविद्यारूप किंवा अशुद्ध—ज्ञान; व ( २ रें ) अंतः करणवृत्तिरहित विशुद्ध ह्म० अतिशुद्ध निर्विकल्प ज्ञान हेंच आत्मा—परमात्माशब्दसंज्ञक होय.

ी कांहीं विचारिलेंच ना, तर मन चित्त कोठें आहे? कशास अ-
तील? मन येथें तर मजवेगळें कांहीं दिसतच नाहीं. आतां मन
सें नांव देखील नाहीं. आहे तो मीच आहे, ज्ञप्तिमात्र. मी कशास
वेचारूं? कशास कांहीं चिंतूं? माझा मी मला ठाऊकच आहे.
हीं कधीं विचारीत नाहीं, व चिंतीतही नाहीं, मी आहें
साच आहें.

गु०–बारे, ऐसें जर तूं समजलास, तर आतां मन कुठें?

शि०–जी! नाहींच मन.

गु०–मन तर मुळासुद्धां नामा सकट खाणून काढिलें, हेंही
म्हणवत नाहीं. अविद्यमान ( कधींच नाहीं असा ) वृक्ष खनन, तन्मू-
लच्छेद असंभवच आहे. तात्पर्य हें कीं, मन कांहींच पदार्थ नाहीं.

शि०–तें नाहीं ऐसें माझे प्रत्ययास आलें. आतां जो आहें
तो मीच आहे. स्वतंत्र समर्थ मीच. मन मीच. चित्त अहंकार इ०
माझींच नांवें हीं. तीं नांवेंच मात्र. वस्तुतः नामेंही मला साजत
नाहींत. ज्ञप्तिमात्र, निर्विकल्प, कल्पनाविवर्जित, सद्रूप मीच आहें.

गुरुरुवाच–( गुरु ह्मणाले ).–ऐसें समजलें रे?

शि०–हो जी!

गु०–आतां तूंच आहेस निर्विकल्प.

शि०–हो जी!

गु०–मन तर नाहीं.

शि०–मन नाहीं; मन ऐसें नांव सुद्धां नाहीं.

गु०–अरे, विवर्त भासाचें कारण मन. तेंच अनुत्पन्न ( उत्पन्न
झालेलें नाहीं. ) मग तेणें करून विवर्त तरी भासला, कीं भासतो,
कीं भासेल ह्मणावयाचा?

शि०–जी स्वामी! विवर्त भासला नाहीं, भासत नाहीं, व

भासणार नाहीं त्याचें भासायाचें कारण मन, तेंच नाहीं. मग विवर्ताभास नाहीं, हें कांहीं ह्मणायास नको. मनच नाहीं, तेव्हां तद्योगें भास्यमान भास तो सहजच नाहीं. आतां मीच आहे विवर्ताभास नाहीं, मन नाहीं. आहे तो मीच आहे. जैशाचा तैसाच आहें.

ऐशा रूपकालंकारें शिष्य वास्तव ( खरेंपणानें ) समजला असतां सद्गुरु बोलते झाले—" बारे, हें वास्तव तुझें स्वरूप तुज समजलें. येथें त्वंशब्दवाच्यत्व, व तच्छब्दवाच्यत्व नाहीं, हें पूर्वींच सांगितलें. आतां 'अयमहमस्मीति' ह्म० 'हा मी आहें, ऐसें' इदम्[1] शब्द-अंगुलीनिर्देशें अहंत्व बोध होतो. ( 'इदम्' ह्म० हा, व 'अहम्' ह्म० मी. 'अंगुलिनिर्देश' ह्म० बोटानें दाखविणें. 'हा मी आहे, या वाक्यांत 'हा' शब्दाच्या बोटदाखविण्यानें 'मी' चा बोध होतो. ) तेव्हां, इदम्शब्दें ( इदम् शब्दाच्या योगानें ) अहंत्व-बोध झाला. परंतु 'मी' ऐसें जें अहंत्व, तें इदम्शब्दातीत आहे. अहंत्व अहंशब्दगतच आहे. याकरितां, व 'अहमात्मा' ( ह्म० मी आत्मा, असा ) बोध झाला असतां, आतां 'अयमहमात्मा' ( ह्म० हा मी आत्मा ) ऐशा 'इदम्' शब्दाची ( 'हा' या शब्दाची ) प्रवृत्ती नाहीं. अहमात्मेति येथेंही अहंशब्दगत अहंत्व, तें 'स्व'शब्दोपादानक ( 'स्व' शब्द आहे उपादानकारण ज्याला असा ) आहे. अहंत्व तर स्वत्वेंकरून प्रकाश्य आहे. ( स्व ह्म० आपण, स्वत्व ह्म० आपणपणा. हें आपणपणाचें ज्ञान मीपणाच्या ज्ञानापूर्वींचें व स्वाभाविक आहे. या स्वाभाविक आपणपणावर—आपणपणाच्या ज्ञानावर 'मी' अशी स्फुर्ति अ० भावना उठते. 'मी' अशा स्फुर्तीला जाणणारें तत्पूर्वींचें आपणपणाचें ज्ञान स्थित आहे. ह्मणूनच वर, 'अहंत्व हें स्वत्वेंकरून प्रकाश्य ह्म०

---

१ 'इदम्' ह्म० हा, ही, हें. याचीं संस्कृत भाषेत अयम्, इयम्, इदम् हीं अनुक्रमें पुल्लिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंगाचीं रूपें होत.

प्रकाशिलें जाणारें आहे, ' असें ह्मटलें आहे. याचा विचारवंतांनीं सूक्ष्म-दृष्टीनें विचार करावा ह्मणजे लगेच ध्यानांत येईल; व हें ' आपणपणाचें शुद्ध ज्ञान ' एकदां समजून चुकलें ह्मणजे पुढील ग्रंथ भराभर लागूं लागेल. सद्गुरु व संतकृपेनें—सत्समागमानें—सद्विचारानें या ज्ञानाचा उदय झाला ह्मणजे काम आटपलें. ) प्रकाशक तर स्वत्व ( आपणपणाचें ज्ञान ) आहे. ' अहं ' शब्द ' स्वत्वा'धारें ( आपणपणाच्या ज्ञानाधारें ) प्रकाशित होतो. तेव्हां अहंशब्दें लक्ष्य ' स्वत्व ' आहे ( अहंशब्दानें स्वत्व ह्म० आपणपणा लक्ष्यांत आणावा. शब्दानें निःशब्द वस्तु लक्ष्यांत आणावी.—' अहं ' हा शब्द, व ' आपण ' हा निःशब्द, ही खूण विसरूं नये. ) आतां स्वशब्द स्वतंत्रच आहे तेव्हां स्वत्वाचे ठायीं अहंशब्द प्रवृत्ति नाहीं. आतां स्वशब्दें जो आहे तो आत्माच बोलतो ( त्यास आत्मा ह्मणतात. ) येथील व्यवस्था तर,—स्वशब्द ज्या अर्थास सांगतो, तो अर्थ ' आपणच ' अनादि स्वतःसिद्धच आहे. तेव्हां स्वशब्द, त्याच अर्थाधिष्ठानीं पूर्वसिद्ध जो अर्थ त्यातेंच प्रतिपादन करितो, अर्थाधारें ( अर्थाच्या आधारानें ) वागतो, वास्तव ( खरा ) अर्थ सांगतो; परी ( परंतु ) आपण शब्द फोल. मिथ्या इत्यर्थः ( मिथ्या असा अर्थ. ) कां कीं, तो अर्थ शब्दापूर्वींच आहे. त्यास शब्दार्थ ( शब्दाचा अर्थ ) ऐसें कोणी ह्मणावें? तो ( आपणपणाचा अर्थ ) स्वयंसिद्ध आहे. तदाधारें ( त्याच्या आधारानें ) ' त्वं, ' ' तत्, ' ' इदं, ' ' अहं, ' ' स्व ' इत्यादि शब्द वागतात. परंतु तो कोणत्याही शब्दास आतळत नाहीं. ऐशियास शब्दातीत बोलताहेत ( ह्मणतात ) ऐसे ( याप्रमाणें ) सर्व भाव लीन झाले असतां कोणताहि भाव न स्फुरे. तेव्हां ' ब्रह्माहमस्मि ' ( मी ब्रह्म आहें ) हेंही अहंत्वस्फुरण लीन झालें. भावाभावातीत एक वस्तुच राहिली ज्ञप्तिमात्र.

तेव्हां शिष्य बोले—" जी! आतां शून्य आहे ऐसें वाटतें-

काहींच नाहीं ऐसें वाटतें."

स्वामी हांसोन बोलले–"वा रे, 'माझी जिव्हा काय झाली?' ऐसें कोणी भांबावून बोलतो. परंतु जिव्हेंकरूनच बोलतो, जिव्हा आहे ह्मणून बोलतो. तेव्हां, जिव्हा आहे अशी गोष्ट सिद्ध झाली नाहीं काय? तैसें तुझें बोलणें वाटतें. अरे धादांतपणें ( भांबावून ) ह्मणतोस–कांहीं नाहीं ऐसें वाटतें. पण तूंच नसतास तर 'कांहीं नाहीं' ऐसें शून्य कोणास कळतें? कांहींच नसतें, तर कांहीं नाहीं तें कांहींच नाहीं. मग, कांहींच नाहीं तें, 'नाहींपण' तरी कसें जाणतें? तें तर कांहींच नाहीं; त्यास कळणेंच नाहीं. तेव्हां कांहीं नाहीं ऐसें ह्मणूं नको. अरे, तूं आहेस 'केवळ' ज्ञानस्वरूप. जाणीव राहिली नाहीं. अहंस्फुरणच लीन झालें. ( आपणपणाच्या ज्ञानावर जी 'मी' अशी स्फूर्ति उठत होती, ती नाहींशी झाली. मग ) राहिलें केवळ ज्ञानच. त्याणेंच ( त्या ज्ञानानेंच ) त्यास ( ज्ञानास ) काय जाणावें? तें केवळ ज्ञान. त्यास जाणावयास कोणताच भाव

१ "परमात्मा हा आपण आपल्यास जाणल्यावांचून 'ज्ञानमात्र' आहे असें ( श्रीज्ञानेश्वर महाराज आपल्या 'अनुभवामृत' ग्रंथांत ) सांगतात.–( ओंव्या ) परि ज्ञानमात्रें निखळें। तेंचि कीं तया कळे। कायि देखिजे बुबुळें। बुबुळा जेंवि १८. आकाश आपणपां रिघे। कां आगी आपणया लागे। आपुला माथा वळघे। आपण कोणी? १९ दिठी आपणया देखे। स्वादु आपणया चाखे। नादु आपुलें आइके। नादपण? २० सूर्य सूर्यासी विवळे। कां फळ आपणया फळे। परिमळ परिमळें। घेपतुसे? २१ तैसें आपणया आपण। जाणतें नव्हे जाण। ह्मणोनि ज्ञानपणेंवीण। ज्ञानमात्र जें २२. अर्थ–समग्र ज्ञानमात्रच परमात्मा आहे, असें त्याचें त्यास कळतें असें ह्मणावें, तर स्वस्कंदारोहणदोष ( आपल्याच खांद्यावर आपण बसणें असा दोष–असंभवनीयपणा ) येतो. ज्याप्रमाणें बुबुळानें बुबुळास पहातां येत नाहीं, तद्वत् आत्मा हा आपण आपल्यास

स्फुरत नाहीं, ह्मणून अभाव ऐसा भासतो. आणि तो भासतो, तर तुलाच भासतो. अभावास अभाव भासत नाहीं. अभावास तूंच जाणतोस. तेव्हां तूंच आहेस. अभाव भासल्याचे पूर्वी जो होतास, तोच तूं अभाव भासला असतांही—अभावासही जाणतोस. अभाव जाणितला तो अभाव ह्मणजे कांहींच नाहीं, ऐसें समजलें. तेव्हां कांहींच नाहीं, तें नाहींच नाहीं. आतां, कांहीं नाहीं ऐसें वाटतें, ऐसें ह्मणत होतास; पण कांहीं नाहीं ऐसें जाणतोस, तो तूं शून्याचा जाणता आहेस कीं!?

**शिष्य०**—हो. जी! मी तर आहे.

**गुरुरुवाच** ( गुरु ह्मणाले—) आतां शून्य नाहींच ऐसें समजलें?

**शिष्य०**—हो जी! शून्य नाहीं. मीच पूर्ण आहे.

---

जाणून ज्ञान मात्र होत नाहीं १८. आकाश हें आपण आपल्यामध्यें प्रवेश करील काय? नाहीं. किंवा अग्नि हा आपण आपल्यास लागेल काय? नाहीं. किंवा कोणीही आपल्या मस्तकावर आपण चढून बसेल काय? नाहीं १९. दृष्टि ही आपण आपणास पाहील काय? नाहीं. स्वाद हा आपण आपणास चाखेल काय? नाहीं. किंवा नाद हा आपलें नादपण ऐकेल काय? नाहीं २०. सूर्य हा आपण आपणास प्रातःकाळ करील काय? नाहीं. किंवा फळ हें आपण आपणास फळेल काय? नाहीं. किंवा सुवासाकडून सुवास घेतला जाईल काय? नाहीं २१. त्याप्रमाणें परमात्मा हा आपण आपल्यास जाणणारा नव्हे असें समज. ह्मणून तो ज्ञानपणावांचून ज्ञानमात्र आहे २२."

( ज्ञा० अनुभवामृत ता० बो० टी० प्र० ४ थें. रा. त. प्र. छा. बे. )

२. ( ओं० ) तरी कांहीं नाहीं सर्वथा। ऐसी जरी व्यवस्था। तरी नाहीं हे प्रथा। कवणासि पैं ॥ २६ ॥ अर्थ—जर आत्मा ह्मणून कांहीं नाहीं अशी व्यवस्था करावी, तर तो नाहीं असें ज्ञान कोणाला झालें? ज्यास झालें, तो शून्यसाक्षित्वेंकरून आहेच. त्यास नाहीं असें ह्मणतां येत नाहीं २६. ( ज्ञा. अनुभवामृत ता. बो. टी. प्र. ४ थें. रा. त. प्र. छा. बे.)

गु०—वा रे, ऐशियास शून्यातीत ह्मणतात. शून्य नाहीं, तेव्हां ती ( शून्यास जाणणारी ) जाणीवही लीन झाली. नंतर भावस्फूर्ति रहात नाहीं. केवळ ज्ञप्तिमात्र ज्ञानच रहातें, तें तूं कीं!

शिष्य०—हो. जी!

गु०—वा रे, ऐशियास भावाभावातीत बोलताहेत (ह्मणतात.) आतां, तूंच निरंतर ऐसाच आहेस. ह्मणून भूत, वर्तमान किंवा भविष्य ऐसा काळच नाहीं. काळ ह्मणजे—कांहीं उत्पन्न होतें, नंतर लागलाच लव पळ ऐशारूपें मागें लागतो. तेव्हां, हा काळ कांहीं दुसरा ऐसें नाहीं. कांहीं उत्पन्न झाल्याचे पूर्वीं कालत्वरहित तूंच आहेस. कांहीं उत्पन्न झालें, त्याच्यामागें काळ होऊन तूंच लागतोस. काळ ऐसें नाम मात्र धारण करितोस. तात्पर्य हें कीं, काळत्व कांहीं नाहींच. तूंच आहेस. परंतु कांहीं उत्पन्न झालें ह्मणजे, कांहीं काळ झाला, ऐशी तेथेंच बोलायास संधी सांपडती. मग, ‘ पूर्वीं ’ ‘ आतां ’ ‘ पुढें ’ ऐसें कल्पित काळत्रय उभें रहातें. उत्पन्न झालें नव्हतें व झालें ऐशिया संधींत काळत्व वागतें. परंतु जें ब्रह्म उत्पन्न झाल्याचे पूर्वींच आहे, तें तर अखंड आहे. तेंच कालत्व धारण करून पदार्थ ग्रासतें. आतां कांहीं दुसरें राहिलेंच नाहीं. तेव्हां इतका तितका वेळ ह्मणायास जागाच नाहीं. तेव्हां, अवांतर कालत्व होतें तें, ज्याणें कालत्व वरिलें होतें त्या काळानेंच कालत्व ग्रासिलें. काळानेंच काळ निवारून आपण अनकळित राहतें. आतां वस्तूचे ( परमात्मवस्तूचे ) ठायीं काळ नाहीं. तूं काळत्वरहित वस्तू परब्रह्म आहेस. ऐशियास ‘ कालातीत ’ ह्मणताहेत. आतां यास केव्हांच ऐसें ह्मणायास ठाव नाहीं, जेव्हां पहावें तेव्हांचें ह्मणोन **सद्योजातं प्रपद्यामि** इत्यादि श्रुति बोलताहेत. आतां, ऐशियास सद्यः जातम् ( नुकतेंच झालेलें ) काय ह्मणावें? हेंही ह्मणणें साजत नाहीं. श्रुति—

' सद्योजातम् ' बोलतां बोलून गेली. मागून पुन्हा समजून लज्जित होऊन येथें ह्मणते ' नेति नेति; ' ह्मणजे सद्योजातम्. ऐसेंही ह्मणणें नाहीं. तेव्हां ऐसियास काय ह्मणावें? पुनः हाव धरून बोलते ' जैसें तें आहे तैसेंच तें, ' ऐसेयास **तस्यैव भावः तत्त्वमिति**, पण हाही शब्द उपचारिक. जें स्वयें अनिर्देश्य, तें शब्दनिर्दिष्ट होत नाहीं. तेव्हां, ' तस्यभावस्तत्त्वमिति ' ऐसें काय ह्मणावें ह्मणोन लज्जित झाली. नंतर, यास कांहीं तरी ह्मणावें ऐसा श्रुतीचा अभिप्राय. कांहीं बोलायास न सांपडलें, तेव्हां तेंच केवळ, ह्मणून **केवलस्य भावः कैवल्यम्** ऐसें बोलिली. नंतरही लज्जित झाली! जो स्वयमेव स्वतः सिद्ध, त्यास केवलाचा भाव कैवल्य असें काय ह्मणावें? फिरून कांहीं तरी ह्मणावें हा हेतु. तेव्हां बृहत्व घेऊन बृहत्वाचा भाव ' **यत् बृहत् तद्ब्रह्म** ' ऐसी बोलिली. नंतर लघुदीर्घाभाव ( लहानपणाचा व मोठेपणाचा अभाव ) पाहिला. तेव्हां, अर्थात् बृहत्व शब्दासंभवच. शुद्ध वस्तुच, त्यास ' ब्रह्म ' असें तरी काय म्हणूं? ऐशी लाज्जित झाली. ऐसियास नामातीत बोलताहेत. आतां नामतः निर्देश नाहीं. कदाचित्, रूपतः निर्देश करावा; तरी नाहीं. तर पूर्वींच सांगितलें त्याप्रमाणें वस्तु भावाभावातीत, अनुभवैकवेद्य ( केवळ अनुभवानेंच जाणतां येण्यासारखी ) व स्वसंवेद्यच ( स्वतःच आपणास जाणणारी-इंद्रियज्ञानानें जाणली न जाणारी अशी ) आहे. तेथें ईदृक् ( असलें ) तादृक् ( तसलें ) एवं ( याप्रमाणें ) ऐसें बोलावयासच ठाव नाहीं. तेव्हां रूपतः निर्देश घटत नाहीं. ऐशियास नामरूपातीत बोलताहेत. आतां येथें श्रुति कुंठित झाली. तेव्हां, **अवचनेनैव प्रोवाचेति श्रुतेः** ह्म० उगीच राहून सांगितलें, येथें श्रुति परतल्या, वेद मौनावला, ऐसें बोलताहेत. आतां, जे निवळ वस्तु आहे, ते तर स्वसंवेद्य ऐसें समजलें. तथापि वेद्यवेदकता ( ज्ञेय

ज्ञातेपणा ) नाहीं ह्मणोन **असंवेद्य स्वसंवेद्य मात्मानं मन्यसे कथं इति; केवलं ब्रह्म संविद्धि वेद्यवेदकवर्जितमिति १०६** [ अर्थ–आत्म्याला असंवेद्य किंवा स्वसंवेद्य असें कसें मानितोस? तो वेद्य-वेदकवर्जित केवळ ब्रह्म आहे असें जाण. १०६ ] आतां वेद्यवेदकवर्जित ऐसेंही आपणच जाणता ( जाणणारा ) आहे, कां आपण स्वप्रकाश विशुद्धस्वरूपच आहे? तेव्हां, आपण जसा आहे तसाच आपण आपणास तर जाणतच आहे कीं, मी असा आहें ऐसें?! आतां येथें जाणीवपण ह्मणावें, तरी तेंही माझ्या स्वरूपीं नाहीं; असा मी आहे ऐसें आपण आपणास पक्का जाणतच आहे. आपण आहे तसा आहेच. ' आहें. ' हें पक्कें जाणता ( जाणणारा, ) हें पूर्तें ठाऊक आहे. आतां बा रे, तूं ऐसा आहेस ऐसें मी वाणीकरून बोलून कैसें सांगूं? तें तूंच समजतोस; तूंच जाणतोस; तुलाच ठाऊक आहे. ऐसें बोलून सद्गुरुसही मौन पडलें.

तंव सद्गुरु पुनः बोलते झाले–" बा रे, कांहीं समजलें? " तंव, शिष्य मौनेंचकरून उत्तर देता झाला.

गुरुरुवाच ( गुरु ह्मणाले ) अरे बा, हा बोध तुज गुरुचे सांगितल्यानें झाला, कीं तूं स्वयंबोधरूपच आहेस?

तंव मर्यादापाळक शिष्य कांहीं बोलेना.

तेव्हां सद्गुरु बोलतात, बा रे, मर्यादापालन तो प्रकार भिन्न. रुद्यः तुझी समज पुसतों, ती तर सांग. तुझा बोध तर पाहूं.

तंव शिष्य सद्गुरुप्रीत्यर्थच आत्मबोधानुभवाविर्भाव प्रौढी प्रकट करून बोलता झाला–" जी! मी स्वतःसिद्ध, ज्ञानवान्, नित्यमुक्त, नित्यबोध, परब्रह्म आहें. मज कोणी सद्गुरु नाहीं; मी कोणाचा शिष्य नाहीं; मी जन्मास आलों नाहीं; कोणास शरण गेलों नाहीं; मला कोणी बोधही केला नाहीं; मी बद्ध नाहीं, मुक्त नाहीं; कांहीं नवीन सम-

जलों नाहीं. कांहीं माझें गेलें नाहीं, नवें कांहीं आलें नाहीं. प्रारब्ध नाहीं. जन्मांतराचा अभाव, तेथें मज प्रारब्ध कशाचें? प्राग्भवही नाहीं. कालत्रयीं जग झालें नाहीं; व कालत्रयही नाहीं."

**गुरुरुवाच** ( गुरु ह्मणाले )–" अरे, हें शास्त्र वेदगुरुमुखें ऐकिलें हें!?"

**शिष्य** बोले–" शास्त्र नाहीं, वेद नाहीं, गुरुशिष्य नाहीं; कोणी सांगितलें नाहीं, मी ऐकिलेंही नाहीं. हेंही इत्यादि सर्व बोलिलें जें, तेंही येथें दुसरें कोणी ऐकावयास नाहीं. मी कोणास सांगतही नाहीं. जसा आहे तसाच स्वप्रकाश, नित्यबोध, स्वतःसिद्ध ज्ञानवान्, सर्वज्ञ, स्वानुभूत्यैकमान, सजातीय–विजातीय–स्वगतभेदरहित, द्वैताद्वैतविवर्जित, स्वसंवेद्य, वेद्यवेदकवर्जित, अनादि परब्रह्म आहें, ऐसें पहिल्यापासून जाणतों. पहिल्यापासूनच ठाऊक आहे. माझा मला नमस्कार असो."

**गुरुरुवाच**–" अरे, कांहीं ध्यान समाधि करशील कीं?"

**शिष्य** बोले–" ध्यान कोणाचें करूं? अखंड मीच आहें. ध्यातृ–ध्यानवृत्ति उभी करीन तर ध्यान होईल. मी तर ध्यातृ–ध्यानरहित, ध्येयपरित्यागी सहजच आहे. माझे ठायीं समाधिही घडत नाहीं. मी देशकालाद्यनवच्छिन्न, अप्राण, अमन आहें. समाधि माझेच पायीं लीन होते. समाधि साधून जी निर्विकल्पता होते. तसा निर्विकल्प, निःसंकल्प, भावातीत, परमानंद मी अनादिच आहें. सहज निरंतर समाधिच आहे. माझी मी नवी समाधि काय करूं? मी अखंड भावाभावप्रत्ययहीनच परब्रह्म आहें. तेव्हां, माझे ठायीं आसन, धारणा, ध्यान, समाधि यांचें नांव नाहीं. मी परमानंद परब्रह्म आहें."

ऐशी सद्गुरूंनीं शिष्याची पूर्णता समजून अति प्रसन्न होऊन आलिंगन देते झाले, व बोलते झाले कीं, धन्य तूं कृतार्थ आहेस. तूं बोलिलास तैसेंच आहे. वास्तविक तुझी वचनोक्ति ऐकून मी प्रसन्न झालों. आतां तुझे वचनोक्तीचें मंडन करून दाखवूं.—

**न गुरुर्नोपदेशश्च न चोपाधिर्न मे क्रिया । विदेहं गगनं विद्धि विशुद्धोऽहं स्वभावतः ॥ १०७ ॥ ध्यानं न तर्को न समाधि योगो न देशकालौ न गुरूपदेश इति । वेदा न लोका न सुरा न यज्ञा वर्णाश्रमा नैव कुलं न जातिः ॥ १०८ ॥ न धूममार्गो न च दीप्ति मार्गो ब्रह्मैक-रूपं परमार्थतत्त्वम् ॥ १०९ ईदृशं सहजं यत्र अहं तत्र कथं भवेत् । त्वमेव हि कथं तत्र कथं तत्र चराचरम् ॥ ११० कशास्त्रं कच वा वेदः कोपदेशः क बोधता । क ध्यानं क समाधि र्वा निरुपाधेःशिवस्य मे ॥ १११ ॥ क विद्या कच वा कालो जिवन्मुक्तिरपि क वा । क जीवःकच तद्ब्रह्म सच्चिदानंदरूपिणः ॥ ११२ ॥** [ अर्थ—आत्मस्वरूपाचे ठायीं गुरु नाहीं, उपदेश नाहीं, उपाधि नाहीं व क्रियाही नाहीं. मी विदेही गगनाकार असून, स्वभावतांच विशुद्धस्वरूप आहे, असें जाण १०७. तेथें, ध्यान नाहीं, तर्क नाहीं, समाधि योग नाहीं, देशकाळ नाहींत, व गुरूपदे-शही नाहीं. याप्रमाणें. तेथें वेद नाहींत, लोक नाहींत; देव नाहींत, यज्ञ नाहींत, वर्णाश्रम नाहींत, व कुल जातीही नाहींत, १०८. धुममार्ग नाहीं, दीप्तिमार्ग नाहीं; तर ब्रह्मैकरूप परमार्थ तत्त्व एकच आहे १०९ याप्रमाणें सहज जेथें आहे, तेथें अहं ( मी ) कसा असेन, तूं कसा असशील, व हें चराचर तरी कसें व कोठें असणार? ११०. तेथें शास्त्र कोठलें, वेद तरी कोठले, उपदेश कोठला, व समजणें तरी कोठलें? माझ्या—निरुपाधिक शिवस्वरूपाचे ठायीं ध्यान कोठलें व समाधि तरी कोठली? १११. विद्या कोठली, काळ तरी कोठला, व जीवन्मुक्ति तरी कोठली? शुद्ध सच्चिदानंद-स्वरूपाचे ठायीं जीव कोठला व तें ब्रह्म तरी कोठलें? ११२. ]

**आत्मस्थितिमाह्** ( आत्मस्थिति सांगतात. ) **प्रशान्त सर्व संकल्पा या शिलावदवास्थितिः । जागृन्निद्राविनिर्मुक्ता सा स्वरूपस्थितिः परा ॥ ११३ ॥ तर्हि आत्मा किं शिलावत् जडस्तत्राह्–जडतां वर्जयित्वैकां शिलाया हृदयं च यत् । अमनस्कं महाबाहो तन्मयो भव सर्वदा ॥ ११४ ॥ यन्मयस्तन्मयो भव इत्यर्थः । अस्यैव यन्मयस्तन्मयः सर्वदा भवेति उपचारार्थम्** [ अर्थ–देहादिक बाह्य प्रपं-

---

१. ( ओंव्या ) सर्व संकल्पाची जे शांती । देहादि इंद्रियें आणि मति । अहंकार प्रमुख अंतर्गती । ते न भासती जिये ठायीं ॥ आणि बाह्यही नाना पदार्थ । घटपटादिकरूनि समस्त । विश्वपरंपरा स्वर्ग मृत्य । आणि समस्त व्यक्तिमात्र ॥ इत्यादिक न स्फुरे मनासी । तेचि संकल्पशांति अतिशयेसीं । निर्वाट अच्छिद्र शिळा जैसी । चेष्टा तैसी गेली त्याची ॥ निचेष्ट आणि सहज यापरी । पर्वत राहे जैसा अंतरीं । संकल्पशून्यता शिळेचिया परी । बाह्य अभ्यंतरीं अतिशुद्ध ॥ एक घेणें एक न घेणें । अथवा पदार्थाकारत्वें स्फुरणें । हें निःशेष नाहीं जें जाणणें । निःसंकल्प ह्मणणें या नाम ॥ पदार्थ पदार्थपणें स्फुरे । तेथेंचि सांडि मांडिही उरे । तोचि संकल्प जाण निर्धारें । इत्यादि न स्फुरे तेचि निर्विकल्प ॥....तरी निद्रा ना स्वप्न जागृती । सर्व संकल्पाची होय शांती । तेचि ते शिळेचियेपरी अवस्थिती । तेचि स्वरूपस्थिति पराकाष्ठा ॥ सर्वही स्थितीहूनि श्रेष्ठ । ते ही स्वरूप स्थिति अति वरिष्ठ । इयेहुनी नाहीं उत्कृष्ट । हेंचि स्पष्ट श्रेष्ठपणें ॥.... मागुती संस्कारेंकरूनि । विपरीत भावना नुपजे क्षणीं । तेचि परब्रह्म जाण निर्वाणीं । खूण मनीं दृढ धरीं ॥ येथें रहाणें जिये वृत्ती । तेचि दृढ जाण ब्रह्मस्थिति । ते शिळेपरी निर्वाट गती । अचळ स्थिति अंतर्बाह्य ॥........ आतां ऐक गा रघुनाथा । सांडावी शिळेची काठिण्यता । कठिण ते जड अप्रकाश सर्वथा । त्यजून स्थिरता तैसी घेई ॥ तें जडत्व टाकूनी शिळेची । तियेची हृदयस्थिति स्थीरतेची । निर्वाटपणें स्थिति वस्तूची । सर्व स्थितीची जननीच हे ॥ इयेचि नाम अमनस्क बोलिजे । इयेतेंचि उन्मनी ह्मणिजे । मुळीनता ते हेचि जाणिजे । सर्वांउपरि जे वरिष्ठपणें ॥ तन्मय होई महा-

चस्वरूप सर्व संकल्प शांत झाले असतां, जागृति व निद्राविरहित, केवळ निघोट अछिद्र शिळेसारखी जी स्थिति, तीच उत्कृष्ट अथवा पराकाष्टेची स्वरूपस्थिति होय ११३. तर आत्मा काय शिळेसारखा जड आहे? त्या-बद्दल सांगतात- कीं, शिळेचें जडत्व टाकून तिची स्थिरतेची व घनपणाची जी हृदय स्थिति तीच वस्तुस्थिति होय. इलाच अमनस्क असें ह्मणतात. तर हे महाबाहो! तूं सर्वकाळ तन्मय होऊन रहा ११४. ]

**निस्तरंगोति गंभीरः सांद्रानंदसुधार्णवः। माधुर्यैकर-साधारः परमात्मा विजृंभते ॥ ११५ ॥ न बंधोस्ति न मोक्षोस्ति ब्रह्मैवास्ति निरंतरं। नैकमस्ति न च द्वैतं स-विस्फारं विजृंभते ॥ ११६ ॥ विशुद्धमव्ययं शांतं स्वप्रका-शमनामयं। आपारं परमानंदं परब्रह्म विजृंभते ॥ ११७ ॥**

[ अर्थ—तरंगरहित, अति गंभीर, व केवळ माधुर्यरसाधार असा निबिड परमानंदामृताचा समुद्रच अशा रूपानें परमात्मा शोभतो. ( समुद्रावर लाटा उद्भवतात यास कारण वायू असून, समुद्रापेक्षां उंच सखल होण्यास आ-काश ह्म० पोकळीही जागा असते. परंतु या परमानंदसागरांत—परमात्म-स्वरूपांत लाटा ह्म० तरंग उत्पन्न होण्यास कारण द्वैत असें कांहींच नाहीं, ह्मणून 'निस्तरंग' असें विशेषण जोडलें आहे, व पुढें सांद्रानंद या श-ब्दानें सजातीय—विजातीय—स्वगतभेदरहित केवळ घनानंदस्वरूप लक्ष्यांत आणावें, असें जाणविलें आहे. ) ११५. तेथें बंध नाहीं, मोक्ष नाहीं; तर निरंतर एक ब्रह्मच आहे. तें द्वैत व अद्वैत भावांस ग्रासून एकपणानें स्वतः

---

बाहो। हाचि सर्व साध्याचा रावो। स्थितीमाजीं स्थिति निर्वाहो। स्थितीचा उपावो मुगुटमणी ॥

( रंगनाथी यो० वा० सा० प्र० १० वें, ओं० ४६१।६२।६३।६४।६५।६६।७३।७४।८५।८६।९६२।६३।६४।६५. )

रंगनाथ स्वामींनीं वरील ओंव्यांमध्यें ब्रह्मस्थितीची पराकाष्ठा वर्णन केली आहे. ( वरील दोन श्लोकांवर त्यांची सप्रमाण व सुविस्तृत अशी १११ ओंवी टीका आहे. ) ही स्थिति सद्गुरु कृपेनें ज्याला साध्य झाली किंवा होईल, तोच धन्य, तोच भाग्यवान् व तोच कृतकृत्य असें समजावें.

प्रकाशतें. तें परब्रह्म विशुद्ध, अव्यय, शांत, स्वप्रकाश, निरामय, अपार व परमानंदरूपानें विलसतें. ह्मणजे-त्या स्वरूपांत मायेचा मळ नाहीं, तें अविनाशी आहे, संकल्पविकल्परहित-अचंचल आहे, परप्रकाश नव्हे, त्यांत रोग व्याधीचा वाराही नाहीं, त्याचा पार लावूं ह्मणणाऱ्यास लागणार नाहीं, व त्याहून कोणताच आनंद श्रेष्ठ किंवा अधिक नाहीं. ११६।१७ ]

ऐसें बोलून सद्गुरु शिष्यास आलिंगन देते झाले. शिष्यही सद्गुरूस नमस्कार करून सेवेशीं तत्पर होता झाला.–अखंड परब्रह्म स्वरूपींच रमों लागला.

नमो ऐशिया कैवल्यसागरा ॥ बोधरूपा परात्परा ॥ जेणें अविद्येचा पसारा ॥ दग्ध केला ॥ १ ॥ कैवल्यवस्तूचा बोधक ॥ सकळ जीवांचा तारक ॥ ह्मणोनि कैवल्यसागर देख ॥ नाम आलें ॥ २ ॥ ग्रंथरचनेची पद्धती ॥ नादरोन शब्द व्युत्पत्ती ॥ केवळ बोधरूपा स्थिती ॥ प्रगट केली ॥ ३ ॥ जैशीं सद्गुरुदातारें ॥ सांगिजेलीं अक्षरें ॥ तैशींच तैशीं साचारें ॥ लिहिता झालों ॥

---

१. ( ओं० ) स्त्रीसंभोगरतीच्या अंतीं । जे कीं होय सुखाची प्राप्ती । ते कोटिमुखें बोलिजेती । तैसी ते स्थिती आनंदाची ॥ ब्रह्मपदसुखाची गोडी । कीजे आनंदाची कुरवंडी । तैसी आनंदपरवडी । पडे वेगडी बोलतां वाचे ॥ हें बहु काय बोलों रमाकांता । ब्रह्मानंद चहूंवाचा नये बोलतां । हा अनुभवावा ब्रह्मवेत्ता । जाण तत्त्वतां ज्याचा तेणेंचि ॥ ( रं० यो० बा० सा० प्र० १० वें, ओं० ६०९।६१०।६११. )

॥ ४ ॥ माझिये हृदयीं बैसोनी ॥ जैशी सद्गुरु बोलिला वाणी ॥ तैशीच झाली प्रतिध्वनी ॥ वदनीं माझे ॥ ५ ॥ मज कळावया कारणें ॥ बोलिलेंच बोलिजेलें जेणें ॥ तैसें तैसेंच त्याप्रमाणें ॥ लिहिलें कीं ॥६॥ ह्मणोन येथें द्विरुक्तीचा दोष ॥ न धरितां शब्दलालित्य विशेष ॥ सद्गुरुबोधित अक्षरेंच निर्दोष ॥ रेखिलीं हीं ॥ ७ ॥ येथें नाहीं ग्रंथ प्रबंध ॥ वाग्माधुर्य गद्यपद्य ॥ हा तो केवळ ब्रह्मानंद ॥ ओतिला जी ॥ ८ ॥ येथें शब्द चातुर्य नाहीं ॥ सामान्य शब्द दिसती पाही ॥ ऐसें जाणोनि कांहीं ॥ विटूं नये ॥ ९ ॥ शब्द दिसतां सावडे[1] ॥ हें तों विचक्षणास नावडे ॥ जरी पाहील अर्थाकडे ॥ तरी मोल नाहीं ॥ १० ॥ सांठवणें[2] लोहाचीं ॥ आंत रत्न सांठवलीं साचीं ॥ रत्नाकारता तयांची ॥ उपेक्षा न कीजे ॥ ११ ॥ तैसें वाक्चातुर्य दिसतें मंद ॥ परि अर्थ आहे सच्चिदानंद ॥ पाहतां पाविजे निर्द्वंद्व ॥ पर-

१ विद्वान.स. २ पेट्या, डब्या इत्यादि.

ब्रह्म ॥ १२ ॥ असो जे कां भाविक ॥ भग-
वद्भक्त परमार्थिक ॥ तयांसी येथील कौतुक
॥ कळों येईल ॥ १३ ॥ जे माझिया स्वामीचे
बोल ॥ जे कां सखोलाहूनि सखोल ॥ ज्यांस
पाहतां नाहीं मोल ॥ लोकत्रयीं ॥ १४ ॥
कां ते वेदाचे मुकुटमणि ॥ नातरी परमानं-
दखाणी ॥ जया वाखाणितां वाणी ॥ मौना-
वली ॥ १५ ॥ ऐसी साधकां विनवणी ॥
येथें माझी नाहीं करणी ॥ जो सद्गुरु कैवल्य-
दानी ॥ तोचि ग्रंथा लेहवी ॥ १६ ॥ मज
बैसवोनि अंकीं ॥ कृपा दृष्टीं विलोकी ॥ जे
शुद्ध चैतन्यमूर्ति निकी ॥ निजानंद ॥ १७ ॥
धरोनियां माझा हात ॥ स्वयें आपण लिह-
वित ॥ कारुण्यभावें सांगत ॥ निजबोधु ॥
॥ १८ ॥ कां ते ओनाम्याचे धडे ॥ जेसे
घालिजे मांडोनि खडे ॥ तैसें माझिया हातीं
साबडें ॥ लेहाविलें ॥ १९ ॥ आपण झाला
माझा हात ॥ शब्दबोलता जिव्हेंत ॥ कृपे-
सहित हृदयांत ॥ बैसोन लेहवी ॥ २० ॥

---

३ कर्तृत्व. ४ लिहवितो.

माझिया आडनांवें ॥ अक्षरें लिहिलीं सद्गुरु-देवें ॥ येथें कोणी ह्मणावें ॥ लेहाविलें ऐसें ॥ ॥ २१ ॥ ह्मणोन येथें माझें कृत्य ॥ कांहीं बा नाहीं ऐसें. सत्य ॥ मानोनियां ग्रंथ नित्य ॥ अवलोकिजे ॥ २२ ॥ ग्रंथ सांप्रदायाची वाट ॥ नाहीं गद्यपद्याची खटपट ॥ येथें गुरुखूण चोखट ॥ सिद्ध आहे ॥ २३ ॥ ऐसें बोले जी नारायण ॥ जयास पाहिजे गुरु-खूण ॥ तेणेंच यातें अवलोकन ॥ नित्य कीजे ॥ २४ ॥ त्याचें निवारील जन्ममरण ॥ कृपासिंधु निरंजन ॥ अंगीकरील चैतन्य-घन ॥ परब्रह्म ॥ २५ ॥ इति श्रीमत्परम-तपः परायणश्रीनारायणविरचिते कैवल्यसा-गरः समाप्तः ॥ ७ ॥

---

१ खरी, उत्तम.



## आरती सद्गुरूची. ( चाल साधी )

स्वानुभवें भवतारक जय सद्गुरु मौनी । वेदप्रगीत निजगुजरहस्य प्रकटोनी ॥ मृगजलवत् जग मिथ्या सर्वाहि निरसोनी । स्वानंदामृत चिन्मय प्रकटसि हृद्भुवनीं ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय सद्गुरूमौनी श्रीसद्गुरु मौनी ॥ डुल्लसि ब्रम्हानंदें अति प्रेमेंकरुनी ॥ ध्रु० ॥ अखंड परमानंदाचि विसरुनि हे प्राणी । अविवेकें आपणातें जीवचि मानोनी ॥ विषवत् विषयसुखातें सुख हें कल्पोनी । पावति अति दुःखचि ते हिंडति बहुयोनी ॥ जय० ॥ २ ॥ दुर्लभ दुर्लभ त्यांतहि पुण्यकृत कोणी । वैराग्याद्यधिकारी भाविक वरदानी ॥ तत्तद्भक्तिस्तव तूं सगुणाकृति धरुनी । त्या त्या स्थळांसि जाउनि तारिसि ते प्राणी ॥ जयदेव० ॥ ३ ॥ दृढतर वैराग्यानें विषयेच्छा हरिली । प्रपंच निरसुनि बुद्धि स्वरुपीं मेळविली ॥ देहद्वाराशीं नरवर नगरी त्यजिली । रघुनाथीं गुरुचरणीं भगवन्मति रमली ॥ जयदेव० ॥४॥ त्वंपद तत्पदसाक्षी सन्मय सुखराशी । अंतर बाहेर सर्वाहि व्यापुनि तूं अससी ॥ विरहित गुरुभक्ती जे त्यांतें नाढळसी । लक्ष्मणवंदित आत्मा अभेद चरणासी ॥ जयदेव० ॥ ५ ॥ ॥

---

## आरति २ री. ( चाल—आरती ज्ञानराजा )

आरती सद्गुरुची । सुखकल्पतरूची । सच्चिदानंदनामें । गातां अतर्क्य रुची ॥ ध्रु० ॥ सत्पदें तोचि आहे । कांहीं अणू न साहे । ते खूण काय सांगों । विश्व गिळूनि राहे ॥ १ ॥ चिच्छक्ति चित्त झालें । ज्ञान प्रत्यया आलें । सत्पदें तेंचि ब्रह्म । नाम चित्पदें केलें ॥ २ ॥ शर्करा शुभ्र साची । गोडी चाखतां तेंचि । वस्तुसि भेद नाहीं । रीति अनुभवाची ॥ ३ ॥ सत्व हें उपनेत्र । त्याणें पाहताति नेत्र । पाहणें नेत्रधर्म । उपनेत्र हेतुमात्र ॥ ४ ॥ सत्पदें अधिष्ठान ।

तेंचि चित्पदें ज्ञान । उठतां ज्ञानशक्ति । वस्तुत्वें नसे अन्य ॥ ५ ॥ सत्पदें विश्वधाम । जेथें भासे रजतम । चित्पदें सत्वयोगें । मायाभेद भिन्न नाम ॥ ६ ॥ इंद्रियें विश्व गमे । रजतमही रमे । चित्पदीं भासती हे । दोरीं भुजंगोपमे ॥ ७ ॥ मृगास जळ भेटे । सुख विषयीं वाटे । विषयीं मृगजळ । उर धांवतां फूटे ॥ ८ ॥ सुषुप्तीमाजीं उरे । नित्य सुख तें स्फुरे । तो लाभ बोलवेना । जेथ मन हें मुरे ॥ ९ ॥ सुषुप्तीमाजि कांहीं । भोग भोगणें नाहीं । दे बुडी भोगणार । सुख स्वानंदडोहीं ॥ १० ॥ पडतां गाढ नीज । उरे आनंद निज । भोगितां तेंचि सुख, सर्व सुखाचें बीज ॥ ११ ॥ इंद्रिय भोगलाहो । तोहि तरंग देहो । दोहींत आत्मवस्तु । तेचि आनंदडोहो ॥ १२ ॥ सच्चिदानंद योगी , स्फुरे योग आणि भोगी । श्रीगुरु सर्वांठायीं, दिसे वामनालागीं ॥ १३ ॥

॥ ॐ तत्सत् श्रीसद्गुरुनाथार्पणमस्तु ॥

---



ॐ तत्सत्.

॥ श्री सद्गुरु प्रसन्न ॥

कैवल्यसागरांतील पृष्ठ ५१।५२ यावरील विषय अधिक स्पष्ट होण्याकरितां व ब्रह्माची कल्पना अधिक स्पष्ट समजण्याकरितां तयार केलेलें

# परिशिष्ट.

---

**ब्रह्माचें** स्वरूपलक्षण **सत् चित् आनंद** व **अनंत** या शब्दांनीं सांगितलें आहे. वेदान्त ग्रंथांत **सच्चिदानंद**शब्दाऐवजीं **सत्ता प्रकाश सुख** अथवा **अस्ति भाति प्रिय** असेही शब्द योजितात. **सत्** ह्म० सर्वकाळ असणारें-शाश्वत; **चित्** ह्म० ज्ञानस्वरूप; व **आनंद** ह्म० सुख. सत् किंवा सत्ता हीं एकच. सत्ता या शब्दाचा अर्थ असणेंपणा किंवा अस्तित्व; प्रकाश ह्म० ज्ञान; व सुख ह्म० आनंद; असे हे पर्यायशब्द आहेत. तेव्हां, **ब्रह्म** ह्मणजे **अस्तित्व, ज्ञान** व **आनंद** यांचा एक अपार समुद्र.

सृष्टींतील वस्तूंत अनेक भेद आहेत; तसे ब्रह्मांत नाहींत. **दृश्य** वस्तूंतील अनेक भेद हे **सजातीय, विजातीय** व **स्वगत** या तीन प्रकारांनीं वर्णिले आहेत. झाडाचे—पानें, फुलें, फळें व शाखा इत्यादि जे अवयव, त्यास परस्पराचा **स्वगतभेद** ह्मणतात. एका झाडासारखें दुसरें झाड हा **सजातीय** भेद; व पाषाणादिक हा झाडाचा **विजातीय** भेद. दृश्य (जगत्) सावयव आहे. सावयव ह्मणजे परमाणूंनें झालेलें. ब्रह्म तसें सावयव ह्म० परमाणूंचें झालेलें नाहीं. तें निरवयव—निरंश आहे. त्याचे अंश ह्म० तुकडे पडत नाहींत. याकरितां ब्रह्मास स्वगतादि भेद नाहीं. ब्रह्म सद्रूप आहे, व याहून भिन्न जें जगत् तें असद्रूप आहे. असत् ह्म० मिथ्या ( मृगजळवत्.) तें मुळींच नाहीं. तेव्हां ब्रह्मास विजातीय भेद नाहीं. एका ब्रह्मासारखें दुसरें ब्रह्म असेल, तर त्यास सजातीय भेद ह्मणतां येईल; पण तसें मुळींच नाहीं. ब्रह्मचैतन्य व आत्मचैतन्य ( देहांतील चैतन्य हेंही निराळें नाहीं. ( हा विषय मूळ ग्रंथांत **तत्वमसि** महावाक्यविवरणांत विस्तारें करून

आला आहे. तरी पुनः दृढीकरणार्थ उतारा—) ‘ आत्मा ब्रह्माहून भिन्न झाल्यास देहाच्या आंत मात्र आत्मा आहे, बाहेर नाहीं, असें होईल; व असें झाल्यास देहाचे आंत उत्पन्न होणारे कामक्रोधादिक त्यांचें मात्र भान होईल. बाहेर जे घटादि पदार्थ त्यांचें भान होणार नाहीं. आपणास तर आंतल्या वृत्त्यादिकांचें व बाहेरील घटपटादि सर्व पदार्थांचें भान आहे; याकारणास्तव आंत व बाहेर ज्ञानस्वरूपें करून सर्वांत राहून सर्वांस भासवितों. याकारणास्तव आपण व्यापक आहों. ह्मणून ब्रह्मच आहों. तस्मात् ब्रह्म एकच. या हेतूस्तव ब्रह्माचे ठायीं सजातीय भेद नाहीं. ’ असें श्रीमद्गंगाधरेंद्रस्वामी आपल्या ‘ तत्वविवेक ’ ग्रंथांत ह्मणतात.

आतां, ब्रह्म एकच असतां, तें **सद् चिद् आनंद** या तीन भिन्न भिन्न अर्थांच्या पदांनीं अनुलक्षित केलें, याचें कारण काय? ब्रह्मांत हे तीन गुण निरनिराळे आहेत काय? तर नाहीं. दीप हा ‘ लोहितोष्णप्रकाश ’ ह्म० तांबडा, उष्ण व प्रकाश या शब्दांनीं वर्णिला, तरी जसा या तीन शब्दांत निरनिराळा अर्थ आहे ह्मणून दिव्यांत निरनिराळेपणा नाहीं, दिवा तो एकच आहे; तसें सच्चिदानंदस्वरूप ब्रह्म एकच आहे. ह्मणजे सत् तेंच चित् व चित् तोच आनंद आहे. परस्परांत भेद नाहीं. श्रीज्ञानेश्वर महाराज ह्मणतात—

“ सत्ताचि कीं सुखप्रकाशु । प्रकाशूचि सत्ता उल्हासु ।
हें न निवडे मिठांशु । अमृतीं जेविं ” ॥

( अनुभवामृत प्र० ९ ओ० ७ )

**अर्थ**—‘ **सद्रूप** आत्माच **आनंद** व **चिद्रूप** आहे; व जो **प्रकाश** ह्म० **चित्** आहे, तोच **सद्रूप** व **उल्हासु** ( **आनंदरूप** ) आहे; अमृताहून अमृताच्या गोडीचा भेद करितां येत नाहीं, तसा यांचाही भेद होत नाहीं.’ मग हीं तीन पदें कां घालावीं लागलीं? तर याचे विरुद्ध गुणांनीं जग भरलें आहे; ह्मणजे तें असद्रूप ( मिथ्या, नाशवंत. ) जड ( ज्ञानरहित. ) व दुःखरूप आहे. तसा आत्मा नाहीं, हें सांगण्याकरितां सत् चित् आनंद हीं तीन पदें घालावीं लागलीं, इतकेंच.

" तैसें असदाचिये व्यावृत्तीं । सत् ह्मणों आली श्रुति । जडाचिये समाप्तीं । चिद्रूप ऐसें १० दुः-खाचेनि सर्व नाशें । उरलें तें सुख ऐसें । निगदिलें निःश्वासें । प्रभूचेनि ११ "

( ज्ञा० अनुभवामृत प्र० ५ वें. )

तसेंच, श्रीरंगनाथस्वामींनींही सत्ता ज्ञानाहून भिन्न नाहीं व ज्ञान आनंदाहून भिन्न नाहीं असें प्रतिपादन करितांना योगवाशिष्ठ ग्रंथांत ह्मटलें आहे.—

( ओंव्या )–सत्ता ज्ञानाहूनि भिन्न नसे । ज्ञानहीन तें जड असे । जड तें अनात्मा सर्वांशें । मिथ्याभूत ॥ अथवा ज्ञान सत्तेहूनि वेगळें । ह्मणतांचि कल्पित झालें । कल्पितासि स-त्यत्व कोणें बोलें । विचारिजो ॥ ह्मणोनि सत्ता आणि ज्ञान । परस्परें नव्हतीं भिन्न । तैसेंचि सुखही तद्रूप जाण । अभि-न्नपणेंसि ॥ सुख सत्तेहूनि वेगळें करितां । तरी तें सुख कल्पित तत्वतां । विषयसुखाचेपरी नश्वरता । येईल तया ॥ सत्ता सुखावेगळी जाण । असतां तेथें प्रवर्तेल कोण । सुखें-वीण पाषाण । सेवी कोण्ही ? ॥ आतां सुखा वेगळें ज्ञान । तेंहि तें ऐसेंचि जाण । सुखही ज्ञानेवीण । तेंही जड ॥ एवं सत्ता प्रकाश सुख । परस्परें एकलें एक । स्वगत भेदही निःशेष । नाहींच ब्रह्मीं ॥ ह्मणोनि ब्रह्म तें अद्वयानंद । सच्चिदानंद अगाध । नाहीं जया देशकाळादि छेद । अनंतपणें ॥

( यो. वा. वैराग्यप्रकरण ओं० १३५–१४२ )

आतां, 'अनंत' या शब्दानें ब्रह्म **देश-काळ-वस्तुपरिच्छेदरहित** आहे, असें सांगितलें. पंचभूतात्मक सृष्टींतील सर्व वस्तूंस देशकाळवस्तुपरिच्छेद आहेत. ब्रह्मास नाहींत. ब्रह्म अमुक देशांत आहे, तमुक देशांत नाहीं, असें नाहीं. तें सर्व देशांत-भूमी, आकाश, पाताळ, व सभोंवतालच्या एकंदर दिशांत खालवर एक सारखें भरलें आहे; ह्मणून त्यास **देशपरिच्छेद** नाहीं. तसेंच तें हजार वर्षांपूर्वी होतें, आतां नाहीं, किंवा आतां आहे, पण आणखी लाख वर्षांनीं नाहीं होणार. असेंही नाहीं; याकारितां त्यास **काळपरिच्छेद** नाहीं. तिसरें ब्रह्माहून निराळी एखादी वस्तु असेल, तर त्यास **वस्तुपरिच्छेद** येईल; पण तसेंही नाहीं. आकाशही ब्रह्मासारखें सर्वदर्शी व्यापक आहे, आकाशावाचून रिकामी ठावच नाहीं. व तें सर्वकाळीं आहे; ह्मणून त्यास देश व काळपरिच्छेद नाहीं असें ह्मणतां येईल. पण पृथ्व्यादिक महाभूतें आकाशावाचून दुसरेपणानें रहात आहेत. यासाठीं त्यास वस्तुपरिच्छेद आहे. पण ब्रह्मास नाहीं.

**( ओंव्या )–..... देशकाळ परिच्छेद । आकाशासी नाहीं बाध । तेंचि तें देशकाळें निर्विवाद । वर्तत असे ॥ परि पृथ्व्यादिकें महाभूतें । दूसेपणें असती वर्ततें । घटपटादि व्यक्तें । नाना भासती ॥ येणें वस्तुपरिच्छेद आला त्यासीं । म्हणोनि दृश्य नश्वर सर्वांशीं । आत्मा निरंश आनंदराशी । अपरिच्छेद्य ॥ ह्मणोनि देश काळ वस्तुविचारें । परिच्छेद नाहीं सर्व प्रकारें । अंतु न पवे कोणें निर्धारें । ह्मणोनि 'अनंत' बोलिजे ॥ यालागीं सत्ता सुख स्वप्रकाश । अनंत अपरिच्छेद निरंश । आत्मा प्रिय उदास ब्रह्म ऐसें ॥**

( रं. यो. वा. वै. प्र. ओं. ११०–११९. )

याप्रमाणें ब्रह्म सच्चिदानंदानंत–देशकाळ वस्तुपरिच्छेदशून्य, सजातीय-विजातीय-स्वगतभेदरहित, निरंश, निरवयव व निर्विकार आहे, असें सिद्ध झालें.

तर जगताचें कारण कोणतें? कारणें दोन. एक उपादान कारण व दुसरें निमित्तकारण सुवर्ण हें अलंकाराचें उपादान कारण आहे व सोनार निमित्तकारण आहे. मृतिका घटाचें उपादानकारण, व कुलाल ( कुंभार ) निमित्तकारण होय. वामनपंडित ह्मणतात—( ओं. ) **कारणद्वय वर्तमान । एक 'निमित्त' दुजें 'उपादान'। निमित्त सोनार आणि कांचन। उपादानकारण अलंकारीं ॥' ५१३ ॥** निमित्तकारणास सोडून कार्य रहातें, पण उपादानकारणास सोडून रहात नाहीं. यावर पंडिताचें ह्मणणें —**सोडितां निमित्तकारण । कार्यास घडे-वर्तन । सोनारा सोडोनि भूषण । जाय जैसें ॥ सोनें न सोडी भूषण । भूषण सोडीना सुवर्ण । या उपादानकारण । प्रत्यक्ष ह्मणती ॥** ( यथार्थदीपिका अ. २ रा. ओं. ५१४।५१५ ) इत्यादि. याप्रमाणें घटाचें उपादानकारण मृतिका, अलंकाराचें उपादान कारण सुवर्ण, पटाचें ( वस्त्राचें ) उपादानकारण तंतू व तरंगाचें उपादानकारण जल आहे. त्याप्रमाणें जगताचें उपादान कारण ब्रह्म ( आत्मा ) आहे. ह्याच विषय पृष्ठ १६।१७ यांजवर विस्तारें करून वर्णिला आहे. ( ते श्लोक श्रीमच्छंकराचार्यांचे अपरोक्षानुभूती ग्रंथांतील व कांहीं योगवाशिष्ठांतील आहेत. ) पृष्ठ १२ वरील + या टीपेचें वाक्यही हेंच प्रतिपादन करितें यावर वामनपंडित आपल्या अनुभूतिलेशनामक ग्रंथांत असेंच सांगतात. ( श्लोक. ) **उपादानं स्वप्रकाशं कार्यं तेन प्रकाशितम् । कालत्रयेऽस्त्युपादानं कार्यं नाद्यन्तयोरसत् ( २०० ) अर्थ**—उपादान स्वप्रकाश ह्म० आपणपणाचें ज्ञान ( सच्चिदानंदात्मस्फुरण ) आहे. या स्वप्रकाशानें जगतादि कार्य प्रकाशित होतें याकरितां उपादान हें कालत्रयीं आहे व कार्य हें आदि अंतीं मुळींच नाहीं, ह्मणून तें मिथ्या आहे. श्रीशंकराचार्य अपरोक्षानुभूति ग्रंथांत ह्मणतात— ( **श्लो** ) **कार्यकारणता नित्यमास्ते घटमृदोर्यथा । तथैव श्रुतियुक्तिभ्यां प्रपंचब्रह्मणोरिह ॥ अर्थ**—जशी घट व मृत्तिका यांची कार्यकारणता नित्य आहे, तशीच प्रपंच व ब्रह्म यांचीही आहे, असें श्रुतीनें व युक्तीनेंही सिद्ध झालेलें आहे.

६८ व्या पृष्ठावरही हाच विषय स्पष्ट करून दाखविला आहे. **स्वत** न्म० आपणपणाचें ज्ञान–सच्चिदानंदात्मस्फुरण हेंच अहंवृत्तीला उपादान कारण आहे. जसें घटपटतरंगअलंकारादिकांना मृत्तिकातंतुजल सुवर्णादिक आहे तसें.

**एवं संतवचामृत दिधलें प्याया सभाग्य श्रोतृजनां।**
**स्वकपोलकल्पिता ही नाहीं कळुं द्या सुविश्वसें रचना ॥ १ ॥**

ॐ तत्सत्

**श्रीसद्गुरुचरणारविंदार्पणमस्तु ।**

ॐ तत्सत्

---

बेळगांव 'श्रीरामतत्त्वप्रकाश,' छापखान्यांत छापिलें.



# कैवल्यसागर
## शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | पंक्ती. | अशुद्ध. | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १ | ॐ तत्स | ॐ तत्सत्. |
| ,, | १३ | जें | जे |
| ६ | ७ | जाणतोस कीं | जाणतोस० |
| १० | १ | निर्विकल्पोहमव्ययः | निर्विकल्पोऽहमव्ययः |
| ,, | ३ | नित्यमुक्तोहमच्युतः | नित्यमुक्तोऽहमच्युतः |
| ,, | २१ | चित्तिविश्रम्य | चिति विश्रम्य |
| ११ | २ | शुकादिकाचे | शुकादिकांचे |
| १२ | १ | ; | , |
| ,, | २४ | आहे | आहें |
| १४ | १० | पंचेवीस | पंचवीस |
| ,, | २४ | सुखदुःखाचें | सुखदुःखादिकांचे |
| ,, | २५ | समजावें. | समजावे. |
| १५ | १ | बुवौ | बुद्धौ |
| ,, | २ | तेंतें | तेते |
| ,, | १५ | अन्योन्याश्रमानें | अन्योन्याश्रयानें |
| ,, | २२ | ( त्याचप्रमाणें | ( त्याचप्रमाणें ) |
| १६ | २ | लोक व्यवहारास | लोकव्यवहारास |
| ,, | ३ | आहे | आहे, |
| ,, | २६ | जीवीं | जावी |
| १७ | २ | आहे. मी देहद्वय विलक्षण आहे. | आहें. मी देहद्वयविलक्षण आहें. |
| ,, | ३ | देहद्वय विलक्षणच | देहद्वयविलक्षणच |
| ,, | २२ | क्षेत्रज्ञामति। क्षेत्रज्ञ चापि | क्षेत्रज्ञमिती। क्षेत्रज्ञं चापि |

| | | | |
|---|---|---|---|
| १८ | १४ | वचनें करूनही | वचनेंकरूनही |
| ” | १९ | ॥ ३४ ॥ | ॥ ३४ ॥ याप्रमाणें श्रुतिस्मृतींचीं प्रमाणें आहेत. |
| ” | २० | द्विशः | द्विषः |
| ” | २९ | असें ह्मणतात. | (यापुढील वाक्य येथें नको.) |
| १९ | १३ | ( याकारितां ) | ( याकारितां खरोखर ) |
| १९ | २३ | देहाहून | देहांहून |
| २० | १० | तंव– | तंव– ( तेव्हां ) |
| ” | ११ | झालें | झाले |
| २१ | ५ | कसां | कसा |
| ” | ६ | एसें | एसें. |
| ” | ७ | इदम | इदम् |
| ” | ११ | आपणांस | आपणास |
| २२ | ४ | ह्मणतोस कांहीं | ह्मणतोस मला कांहीं |
| ” | ५।६ | शरीचा निराश | शरीराचा निरास. |
| ” | १३ | हाच तूं | हाच तूं. |
| ” | १६ | बोलें | बोले |
| ” | २३ | श्रुति | श्रुति स्मृति |
| २३ | ७ | जाणतोस | जाणतोस. |
| २४ | १२ | सर्वातीत | सर्वातीत |
| ” | १४ | नेणिवेस | नेणिवेस |
| ” | २० | हा आत्मा मी | तो हा आत्मा मी |
| २६ | ३ | ह्दयग्रंथिच्छिधंते | हृदयग्रंथिश्च्छिद्यंते |
| ” | २४ | वैसे | बैसे |
| २७ | १७ | ह्मणतें | ह्मणते |
| ” | ” | द्वीतीयादैभयं | द्वितीयाद्वैभयं |
| २८ | १४ | मृतिकेलाच | मृत्तिकेलाच |
| ३२ | १९ | जाणिलें | जाणितलें |
| ” | २० | शीवशिवरहित | जीवशिवरहित |
| ” | २९ | अभिमानीं | अभिमानी |

| | | | |
|---|---|---|---|
| ३३ | १० | एतत्संबधरहित हें | एतत्संबंधरहित |
| ,, | १५ | कूटस्थम०क्त | कूटस्थमव्यक्त |
| ,, | १९ | राहणारा. | राहणारा, |
| ,, | ,, | अत्यंत प्राचीन ( अनादि ) | ( अत्यंत प्राचीन-अनादि ) |
| ३५ | ७ | आत्मा | परमात्मा |
| ३६ | १ | एकटाच* | एकटाच |
| ,, | ११ | तें | ते– |
| ,, | १७ | दिकर्वाणात् | द्विकुर्वाणात् |
| ,, | २४ | यातें । ह्मणिजतु | यातें ह्मणिजतु । |
| ३७ | ५ | शक्तिपासून | शक्तीपासून |
| ,, | १३ | नक्षत्र | नक्षत्रें |
| ,, | १४ | अपांग मोक्षण | अपांगमोक्षण |
| ,, | २५ | भुग भुवर स्वर महर | भूर् भुवर् स्वर् महर् |
| ३८ | २० | नेती तिवै | नेतीति वै |
| ३९ | १ | शास्त्रपद्धति | शास्त्रपद्धति |
| ,, | ३ | जहदहल्लक्षणें करून | जहदजहल्लक्षणेंकरून |
| ,, | ,, | अभिपदैक्य जाति | अभिपदैक्यजाति |
| ,, | ४ | ‘ जहदनहद् | ‘ जहदजहद्’ |
| ,, | ८ | कोणवाच्य | कोण वाच्य |
| ,, | १६ | गर्भितार्थ | अथवा गर्भितार्थ |
| ,, | १७ | वाच्याचा | वाच्याचा |
| ४० | ३ | दुसरे | दुसरें |
| ,, | ९ | धावतों | धांवतो |
| ,, | ,, | रक्ष- | रक्ष्य- |
| ,, | १३ | घेतलें | घेतले |
| ,, | २० | भाग त्याग लक्षणेंवांचून | भागत्यागलक्षणेंवांचून |
| ,, | २१ | ते वय | तें वय |
| ,, | २३ | वाच्यार्थाचा | वाच्यार्थांचा |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | २४ | सर्वज्ञत्वादि गुणविशिष्ट | सर्वज्ञत्वादिगुणविशिष्ट |
| ,, | २५ | किंचिज्ज्ञत्वादि गुण- | किंचिज्ज्ञत्वादिगुण. |
| ४१ | १ | त्याचा | त्यांचा |
| ,, | २ | वाच्यार्थाचा | वाच्यार्थांचा |
| ,, | ७ | धर्मांश | धर्मांश |
| ,, | ९ | रखंड्भावः | रखंडभावः |
| ,, | ११ | त्मनो रैक्य | त्मनोरैक्य |
| ,, | १५।१६ | किंचिज्ज्ञत्व | किंचिज्ज्ञत्व |
| ,, | २४ | भाग त्याग लक्षणेनेंच | भागत्यागलक्षणेनेंच |
| ४२ | १ | समष्टिदेहाचें | समष्टिदेहाचें |
| ,, | ९ | तै | तें |
| ,, | १७ | वेदकवर्जित | वेद्यवेदकवर्जित |
| ,, | २०।२१ | आहे..... आहे | आहें..... आहें |
| ४३ | १ | ) श्लोक ) | ( श्लोक ) |
| ,, | ५ | नव्हें | नव्हे |
| ४३ | ६ | त्या प्रत | त्याप्रत |
| ,, | ११ | अर्थ | ( अर्थ |
| ,, | १४ | देशकाला द्यनवच्छिन्न. | देशकालाद्यनवच्छिन्न |
| ,, | १६ | अर्थ | ( अर्थ |
| ४४ | ७ | तत्तदात्म्य | तत्तादात्म्य |
| ,, | १५ | अर्थ | ( अर्थ |
| ,, | १८।१९ | वास–करून | वासनेकरून |
| ,, | २३ | नवलें | नवल |
| ,, | २४ | तेचि | तेंचि |
| ४५ | २० | सुखदुःख | सुखदुःखा |
| ४७ | २ | जायते | जायते |
| ,, | ११ | षड्भाव | षड्भाव |
| ,, | १८ | स्वसर्वगत | स्वयंप्रकाश, सर्वगत |
| ,, | २४ | झाल्याप्रमाणे | झाल्याप्रमाणें |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | २६ | ह्य. मरणें | ह्म. मरणें, |
| ४९ | ४ | एशीं | ऐशीं |
| ,, | ११ | ते काय | तें काय |
| ,, | २४-२५ | विद्धि..... विद्धि | विद्धि.... विद्धि |
| ५० | १ | गगहीनं | गुनहीनं |
| ,, | ३ | निमळ | निर्मळ |
| ,, | २७ | आकारा तें | आकारांतें |
| ५१ | ३ | बहिरं | बहिरं- |
| ,, | ६ | घन व च्छिन्न | घनवाच्छिन्न, |
| ,, | ८ | ह्मणातें | ह्मणावें |
| ,, | २३ | (ही ओळ खाली व खालील ह्म. २४ वी ओळ वर घ्यावी) | |
| ५३ | ३ | आहे पण | आहेपण |
| ,, | ४ | पदार्थ मात्र | पदार्थमात्र |
| ,, | १३ | नाहीं. ऐसा | नाहीं ऐसा |
| ,, | १४ | शिष्य बोले | शिष्य बोले- |
| ५४ | ३ | आत्म्थाचें | आत्म्याचें |
| ५५ | १४ | चिदाकार मिदं | चिदाकारमिदं |
| ५६ | १४ | च | च । |
| ५७ | १० | ७६ | ७६ |
| ,, | १३ | ७७ | ७७. |
| ,, | १५ | स्वभावें करून | स्वभावेंकरून |
| ,, | २६ | योगवाशिष्ठ | योगवाशिष्ठ प्र १० वें |
| ५८ | १ | एक पण. | एक, पण |
| ,, | १८ | देह चियेक | देहचि येक |
| ५९ | ९ | कोठुलें | कोठलें |
| ,, | ११ | ह्मणुन | ह्मणून |
| ,, | १५ | ह्मणून | ह्मणून |
| ६० | ७ | ह्मणावयाला. | ह्मणावयाला |
| ,, | १० | ह्मणतां, | ह्मणण्यात |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | २० | साक्षेप | सापेक्ष |
| ६१ | १ | तथापि | (नवीन शब्द) |
| ,, | १३ | ज्ञानं सतिभ्रम | ज्ञाने सति भ्रम |
| ,, | १८ | भासते; | भासतो. |
| ,, | २४ | भ्रम, | भ्रम |
| ६२ | १४ | हुरमं | हुर्मुं |
| ,, | ,, | असर्वभूत | असर्पभूते |
| ,, | २० | एव | एष |
| ,, | २१ | शशश्रृंग | शशश्रृंग |
| ६३ | ११ | जगत्रयम् | जगत्रयम् |
| ६४ | ६ | तें | तरी तें |
| ,, | ९ | वस्तुत्व....विद्धि | वस्तुत्वं....विद्धि |
| ,, | २६ | परमात्म्याचें | परमात्म्याचे |
| ६६ | ३ | ह्मणन | ह्मणजे |
| ,, | ७ | तोटा | तो तंटा |
| ,, | २३ | जर | जर कांहीं |
| ,, | २७ | अंतः करणवृत्ति. | अंतःकरणवृत्ति. |
| ,, | २८ | ज्ञान | ज्ञान. |
| ६७ | ९ | नामा सकट | नामासकट |
| ६८ | १८ | असा | असें |
| ७१ | १२ | ज्ञान मात्र | ज्ञानमात्र |
| ,, | ७ | ऐसें | ऐसें |
| ७५ | २२ | प्रत्यहीनच | प्रत्ययहीनच |
| ७६ | ३ | वचनाक्ति | वचनोक्ति |
| ,, | ६ | विद्धि विशुद्धो | विद्धि विशुद्धो |
| ,, | १४ | जिवन्मुक्ति | जीवन्मुक्ति |
| ७८ | १० | विशुद्ध | विशुद्ध |
| ८१ | १५ | ओना म्याचे | ओनाम्याचे |
| ८३ | ३ | ह्मणोन | ह्मणोन |

**टीपांची दुरुस्ती**—९० व्या पानावरील २ अंकाची टीप ९१वे पानावर आली आहे, व ९१ वे पानावरील २ अंकाची टीप ९२ वे पानावर, आणि ३।४।५।६।७ या अंकांच्या टीपा ९३ वे पानावर गेल्या आहेत. ९२ वे पानावरील + * या टीपा ९३ वे पानावर गेल्या आहेत. ९४ वे पानावरील १ ही टीप ९६व्या पानावर घेतली आहे, व पान ९७ वरील + ही टीप ९८ वे पानावर गेली आहे. [illegible] पूर्वक पाहिलें असतां कळण्यासारखें आहे. तसेंच ४४।८१।८२ वगैरे पानांवरील टीपाचे आकडे घालण्यांत चूक झाली आहे परंतु त्यांत घोटाळा पडण्यासारखा नाहीं.

## पान २१ वर, मूळ ग्रंथांतून घेणेचें राहिलेलें कोष्टक.

| भूः | आप. | तेज. | वायु. | आकाश. | ० |
|---|---|---|---|---|---|
| शब्द. | वाक. | श्रोत्र. | व्यान. | अंतःकरण. | १ |
| स्पर्श. | पाणि. | त्वक्. | समान. | मन. | २ |
| रूप. | पाद. | चक्षु. | उदान. | बुद्धि. | ३ |
| रस. | उपस्थ. | जिव्हा. | प्राण. | चित्त. | ४ |
| गंध. | गुद. | घ्राण. | अपान. | अहंकार. | ५ |

# स्फुट पदें.

जिन्नेतुजकूंपैदाकिया. करउसकासंदेसारे ॥ इंद्रजालवत्प्रपंचसारा-सुतवंध्येचाजैसारे ॥ ध्रु० ॥ तनजोवनअसकहुवाक्यापायाआरामरे ॥ इंद्रियजन्यसुखातेंभाळुनिनेणसिआत्मारामरे ॥ १ ॥ क्यौंगफलतमें गाफलहुवा किसलालंचपरप्यासारे ॥ किरणनजाणुनिभ्रमतिहरणे जैशींउदकाभासारे ॥ २ ॥ क्याआमनहींकियेकुफरसें क्यौंकरहिहुवा दिवानारे ॥ आत्मातूंअविनाशहोउनी मानिशिजन्मामरणारे ॥ ३ ॥ तनकीयेमेंएकाजनार्दन लाखखडावेपर्वारे ॥ त्र्यंबकपणहेंत्यालाअर्पुनि भोगिसुखाचाठेवारे ॥ ४ ॥

## ॥ पद ॥ २ ॥

निर्भयअचलअभंग ग्रासुनिसंग ॥ साधुमहींविचरतिनिर्भयअचळ० ॥ ध्रु० ॥ जागृतासीस्वप्नभ्रमकैंचागजरथधेनुतुरंग ॥ साधुमहीवि० ॥ १ ॥ सत्ताएकानेकींविलसे ॥ जीवनिजेवितुरंग ॥ २ ॥ चिद्व-पुविशुद्धभस्मोद्धूलित ॥ जाळुनिअशुभानंग ॥ ३ ॥ दग्धपटासम त्र्यंबकहोत ॥ एकाजनार्दनीसंग ॥ सा० ॥ ४ ॥

## ॥ पद ॥ ३ ॥

विठ्ठलविठ्ठलबोलमना करसाधनसोप ॥ होइजागाआवरीझोंप ॥ ॥ ध्रु० ॥ प्रपंचविषयझोंपआली ॥ केलितिणेंगर्दी ॥ हालविलीमर्दाचीमर्दी ॥ स्वहित आपुलेंनेणोनियां होसितिचावर्जी ॥ ऐसाकैसा बेदरदी ॥ कन्यादाराधनपुत्री विषयावरिलोलुप ॥ होइजागाआवरीं झोंप ॥ १ ॥ भ्रांतितुजलाकशिपडली जडलीक्रियाआधि ॥ नाना परिचीउपाधी ॥ रामरामहाध्यामंत्र ॥ होतारकसिद्धी ॥ मुख्यसाधन हेंतूंसाधी ॥ घडिघडिपळपळविसरूंनको लागोदेचोप ॥ होइजागा आ० ॥ २ ॥ झोंपनव्हेहाकाळतुझाग्रासायापाहतो ॥ आयुष्यघेऊ